


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. २८८,
जानेवारी-फेब्रुवारी-मार्च १९९९

महाराष्ट्र साहित्य पत्रिका



७२ व्या अखिल भारतीय
मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्रा. वसंत बापट







Maharashtra Sahitya Patrika Quarterly July, August, September 2000
Registered with the Registrar of Newspapers for India Under No. 6398/57



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २८८
जानेवारी-फेब्रुवारी-मार्च १९९९

□

संपादक
ह. ल. निपुणगे

□

**संपादन समिती**
राजा फडणीस (प्र. कार्यवाह)
प्रा. श्रीराम पुजारी
डॉ. वि. भा. देशपांडे
डॉ. ल. रां. नसिराबादकर
डॉ. अंजली सोमण
प्रकाश होळकर

□

महाराष्ट्र साहित्य परिषद
टिळक रस्ता,
पुणे ४११ ०३०.
दूरध्वनी : ४७५९६३

अनुक्रमणिका



# अनुक्रमणिका





मुद्रक-प्रकाशक : राजा फडणीस, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.
मुद्रणस्थळ : जंगम ऑफसेट, प्रा. लि., २५/१०, नांदेड फाटा, पुणे ४११ ०४१.
मुखपृष्ठ रचना : स. म. जंगम
संगणकीय अक्षरजुळणी : यशश्री एंटरप्रायजेस, कोथरूड, पुणे ४११ ०२९.
मूल्य : रुपये तीस    वार्षिक वर्गणी संस्थांसाठी : शंभर रुपये.
आजीव सदस्य शुल्क : रु. ५००/-    वार्षिक सदस्य शुल्क : रु. ५०/-
अंक क्र. २८८, जानेवारी-फेब्रुवारी-मार्च १९९९

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले आहे.
या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी सा. सं. मंडळ किंवा राज्यशासन सहमत असेलच असे नाही.

**महाराष्ट्र साहित्य पत्रिका**
वृत्तपत्र नोंदणी कायद्यानुसार (नमुना ४, नियम ८) द्यावयाची माहिती
**प्रसिद्धीचे ठिकाण :** महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ३०
**प्रसिद्धीचा काल :** त्रैमासिक
**मुद्रक आणि प्रकाशक :** राजा फडणीस, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०
**राष्ट्रीयत्व :** भारतीय
**संपादक :** ह. ल. निपुणगे, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०
**राष्ट्रीयत्व :** भारतीय
**नियतकालिकाची मालकी :** महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०
मी असे जाहीर करतो की वर दिलेला तपशील माझ्या माहितीप्रमाणे बरोबर आहे.
१/३/९९    राजा फडणीस, प्रकाशक

# संपादकीय

ह. ल. निपुणगे

---

महात्मा गांधीजींच्या जयंतीच्या शतकोत्तर रौप्यमहोत्सवानंतर, त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा आणि विचारांचा पुन्हा एकदा नव्याने विचार होऊ लागला आणि त्यावर ग्रंथनिर्मिती होऊ लागली. डॉ. द. न. गोखले यांनी लिहिलेल्या 'गांधीजी मानव नि महामानव' या १९९६ मध्ये प्रकाशित झालेल्या वैचारिक ग्रंथाचे वाचकांकडून चांगले स्वागत झाले. या ग्रंथाला पारितोषिकेही मिळाली. या ग्रंथावर म. सा. पत्रिकेच्या जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर १९९७ च्या अंकात डॉ. वि. रा. करंदीकर यांनी लिहिलेला विस्तृत लेखही वाचकांना भावला. त्यातील काही आक्षेपांना डॉ. द. न. गोखले यांनी दिलेली उत्तरेही त्यापुढील अंकात प्रसिद्ध झाली.

त्यानंतर मागील वर्षी म्हणजे १९९८ साली 'शोध महात्मा गांधींचा' या प्रा. अरुण सारथी यांनी लिहिलेल्या द्विखंडात्मक चरित्रग्रंथाचे प्रकाशन झाले. या ग्रंथाचे वैशिष्ट्य म्हणजे गांधीजींच्या जीवनातील ज्या घटनांना इतिहासात अथवा चरित्रात फार नगण्य स्थान मिळाले असते, अशा घटनांचे तपशीलवार विश्लेषण त्यांनी या ग्रंथात केले आहे. गांधीजींच्या व्यक्तिमत्त्वाचा शोध हा प्रधान हेतू ठेऊन या घटनांची निवड त्यांनी केली आहे.

हे दोन्ही ग्रंथ म्हणजे गांधीजींच्या विचारांचे दोन भिन्न प्रवृत्तीच्या लेखकांनी केलेले मंथनच होय.

या ग्रंथावर लिहिलेला श्री. श्री. म. जोशी यांचा विस्तृत परामर्षक लेख ह्या अंकात दिला आहे. मागील अंकातील आणि या अंकातील लेख वाचून वाचक हे दोन्हीही ग्रंथ वाचण्यास उद्युक्त होतील असे वाटते.

या अंकातील दुसरा महत्त्वाचा लेख म्हणजे कवी यशवंतांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने त्यांच्या काव्याचा वैशिष्ट्यपूर्ण आढावा घेणारा विस्तृत लेख. त्यांच्या भावपूर्ण काव्याचे वाचन नव्या पिढीने करावे असे वाटते. त्यांच्या अनेक कविता आपण पुन्हा पुन्हा वाचाव्यात आणि त्यातील विचारांचे मनन, चिंतन कराव्यात अशाच आहेत.

प्रा. वसंत बापट यांच्या साहित्यावर प्रबंध लिहिलेल्या बाळासाहेब गुंजाळ यांचा लेखही प्रा. बापटांच्या लेखनगुणांचा आलेख उभा करणारा आहे. ७२ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष आहेत. त्यांच्या संपूर्ण प्रकाशित साहित्याची सूचीही याच लेखात दिली आहे.

अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनात विविध वक्त्यांनी व्यक्त केलेले विचार कधीच एकत्रितपणे वाचावयास मिळत नाहीत. ७० वे अ. भा. म. सा. संमेलन अहमदनगर येथे झाले. मराठी साहित्याच्या इतिहासात संमेलनाच्या संदर्भात प्रसिद्ध झालेला 'संवाद' हा पहिलाच ग्रंथ



अनुक्रमणिका

आहे. संमेलनात जे काही घडले, त्याचे दर्शन ग्रंथाच्या पानोपानी आहे. या ग्रंथाच्या निमित्ताने एकूणच साहित्य संमेलनाबाबत प्रा. न. म. जोशी यांनी मांडलेले विचार महत्त्वाचे आहेत. वाचकांनी हा ग्रंथ अवश्य वाचावा.

गेल्या दोन वर्षांप्रमाणेच दिवाळी अंकातील ललितेत्तर साहित्याची सूची या अंकात दिली आहे. दिवाळी अंकांचे संपादक आपल्या अंकांचे वैशिष्ट्यपूर्ण संपादन करीत असतात. त्यामध्ये अनेक विचारवंतांनी लिहिलेल्या वैचारिक लेखांचा समावेश असतो. कोणत्या अंकात आपल्या आवडीच्या विषयावरील लेख आला आहे, हे वाचकांना समजावे आणि वाचकांनी ते अवश्य वाचावेत हा हेतू यामध्ये आहे. वाचकांकडून आलेल्या पत्रांवरून असे संकलन वाचकांना उपयुक्त वाटते असे दिसते.

जानेवारी आणि फेब्रुवारी ९९ मध्ये महाराष्ट्रात वेगवेगळ्या ठिकाणी वेगवेगळ्या विचारांच्या विचारवंतांनी साहित्य संमेलने साजरी केली. त्यातील जळगावचे समरसता साहित्य संमेलन, मुंबईचे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन, श्रीगोंद्याचे ७ वे राज्यस्तरीय ग्रामीण साहित्य संमेलन, उरण-इस्लामपूरचे सातवे मराठी साहित्य संमेलन ही अधिक महत्त्वाची होत.

या सर्व साहित्य संमेलनात काय काय घडले याची चर्चा त्या त्या वेळी वृत्तपत्रातून झालेली आहेच. त्यासंबंधी काही लिहावे असे वाटत नाही. परंतु एक मुद्दा मात्र विचार करण्यासारखा वाटतो. अशी आणि इतकी विविध प्रकारची संमेलने हवीत का? या संमेलनांना होणारा प्रचंड खर्च सरकारी अर्थसहाय्य अगर कोणत्यातरी मोठ्या धनिकाच्या सहाय्याशिवाय होत नाहीत हे नक्कीच आहे. मग अशा संमेलनांवर धनिकांचे वर्चस्व राहणारच !

विचारवंतांचे विचार प्रसृत होण्यासाठी अशा संमेलनांची गरज तर आहेच. मोठ्या संमेलनात वरच्या गटातील लेखकांना-विचारवंतांना संधी मिळते. छोट्या-छोट्या साहित्य संमेलनात त्या त्या भागातील लेखकांना सहभागी होता येते. म्हणूनच अशी सर्वप्रकारची संमेलने होणे आवश्यकच आहे. त्यातून विचारांचे आदान-प्रदान चांगले होते. समाजातील सर्व प्रकारच्या विचारांना चालना मिळते. लेखकांना-वाचकांना एकत्र येता येते.

वरील सर्व बाबींचा विचार केल्यावर असे वाटते, की ही सर्व संमेलने अवश्य व्हावीत, पण स्वबळावर. त्यासाठी साहित्यिकांनी आणि रसिकांनी कुणाच्या आर्थिक मदतीवर अवलंबून न राहता संमेलनाचा सर्व खर्च-त्यासाठी लागणारी रक्कम साहित्यप्रेमींकडून जमवावी आणि अशी संमेलने साजरी करावीत. म्हणजे या संमेलनात कोणी कोणते विचार मांडावेत यावर कोणाचेही बंधन राहणार नाही आणि प्रत्येकाला मुक्तपणे आपले विचार प्रकट करता येतील.

म. सा. पत्रिकेचा मागील अंक 'दशकातील कथाकार विशेषांक' म्हणून प्रकाशित झाला. या अंकातील कथांच्या निवडीबाबत अनेक अनुकुल आणि प्रतिकूल पत्रे आली. काहींनी आपले मतभेद व्यक्त केले. कथांच्या निवडीबद्दलही काहींनी असमाधान व्यक्त केले. प्रत्येक गोष्टीत मतभेद हे असणारच, त्याला इलाज नाही !

या अंकाबद्दलच्या वाचकांच्या प्रतिक्रिया अपेक्षित आहेत.

□

# समाजमनाला भिडणारी कविता

म. पां. भावे

महाराष्ट्र कवी यशवंतांचे हे जन्मशताब्दी वर्ष. या शताब्दीनिमित्ताने त्यांच्या एकूण काव्याची धावती ओळख करून द्यावी यादृष्टीने हा लेखन प्रपंच.

एक गोष्ट सत्य आहे की, समाजातील प्रत्येक पिढीमधे भौतिक, आर्थिक, सामाजिक, वैचारिकदृष्ट्या नेहमीच बदल होत असतात. अर्थात या बदलाचा अपरिहार्य परिणाम म्हणून विविध कलांमधेही असा बदल होतच असतो. काव्य क्षेत्राचाच विचार केला तर गेल्या साठ वर्षांत काव्याच्या रचनेत, विषयाच्या वेगळेपणात, आकृतीबंधात कितीतरी वेगवेगळे प्रयोग झालेले आपणास दिसतील. मध्यम वर्गापुरत्या मर्यादित स्वरूपात असलेल्या या कवितेने आता विशालरूप धारण केलेले आहे. समाजातील विविध वर्गातील घडामोडींचे, भावनांचे, वैचारिक बदलांचे प्रतिबिंब त्यातून आपणास जाणवते. सामाजिक बांधिलकी, ग्रामीण समाज, दलित समाज, कामगार वर्ग अशा विविध समाजातील मंडळी त्यांच्या सामाजिक जीवनातील भावभावनांचे, अनुभवांचे दर्शन त्यांच्या काव्यातून मोठ्या प्रमाणात व्यक्त करू लागले आहेत.

कवी यशवंताचा काळ बराचसा पारतंत्र्याचा. त्यामुळे त्यांच्या काव्यात स्वातंत्र्यावरील कविता तसेच कौटुंबिक, प्रेमविषयक, गैररुढी, अन्याय, समाजवृत्ती, स्वविचार, प्रभुभक्ती, दीर्घकविता यांचे दर्शन घडते. खरं म्हणजे कवीच्या वेळी सभोवताली जी परिस्थिती असेल, जी समाजस्थिती असेल, त्याचा परिणाम कवीच्या काव्यातून व्यक्त होणं अगदी स्वाभाविक होय.

बदल हे प्रगतीचे लक्षण असते असं मानलं तर काव्यक्षेत्रातील हे सारे बदल स्वागतार्हच आहेत.

कवी यशवंतांची काव्यविषयक अशी १४ पुस्तके आहेत. याशिवाय गद्य लेखनाची ३ तर बालवाङ्मयाची ८ पुस्तके आहेत. त्यांच्या कवितेने त्याकाळी सबंध महाराष्ट्र झपाटलेला होता. रविकिरण मंडळ हे त्यावेळचे लोकप्रिय मंडळ. या मंडळात कवी गिरीश, माधव जुलियन, यशवंत आदि कवींचा सहभाग असे. त्याकाळी काव्यगायनाचे कार्यक्रम गावोगावी होते असत. त्यामुळे कविता लोकप्रिय होण्यासही मदत होई. विंदा करंदीकर, मंगेश पाडगावकर, वसंत बापट, यांनीही काव्यवाचनाने कविता महाराष्ट्रभर लोकप्रिय केली हे आपणा सर्वांना ज्ञात आहेच.

अलिकडे बापट-करंदीकर-पाडगांवकर यांच्यावर व्यासपीठीय कवी म्हणून आक्षेप घेतला जातो. परंतु कवी यशवंतांच्या वेळच्या रविकिरण मंडळातील कवीही कविता गाऊन व वाचूनच दाखवीत होते. त्यामुळे कविता सर्वदूर पोचत असे. कुठलीही गोष्ट पुन्हा पुन्हा

कानावर पडली तर ती लक्षात राहते व ती गोष्ट चांगली असेल तर समाजात लोकप्रिय होते. कविता जनमानसात रुजविण्याच्या दृष्टीने काव्यवाचन वा गायनासारखे दुसरे उत्तम साधन नाही. पुस्तकातील कविता सर्वदूरपर्यंत पोचत नाही तेव्हा या कविमंडळींना व्यासपीठीय कवी म्हणून हिणविण्यात काही अर्थ नाही.

यशवंतांची पहिली कविता १९१९-२० चे सुमारास 'तारकानाथ' या टोपणनावाने प्रसिद्ध झाली. पण पुढे १९२१ साली बडोदा येथील न. चिं. केळकर यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या साहित्य संमेलनात यशवंतांना काव्यवाचनाची संधी मिळाली, त्यावेळी त्यांनी 'स्वातंत्र्य लक्ष्मीस' व 'देहाचा पूल' या दोन कविता गाऊन म्हटल्या. त्या कवितांना अतिशय उत्तम दाद मिळाली. तेव्हापासून त्यांनी टोपण नावाचा त्याग करून ते 'यशवंत' या नावानेच कविता लिहू लागले. या दोन्ही कवितांचे विषय अर्थात स्वातंत्र्यासंबंधींचेच होते.

यशवंतांचा स्वाभाविक पिंड आदर्शवादी, संस्काराला महत्त्व देणारा, चांगल्या प्रवृत्तीची ओढ असलेला असा आहे. कवितेचे स्वरूप पूर्णतः गेय स्वरूपाचे. कवितेतून आढळणारी वैशिष्ठे म्हणजे भावोत्कटता, सामान्याच्या सुखदुःखाशी समरस होणारी, सहजसुलभ, ओघवती भाषा, अशा प्रकारची आहे. त्यांच्या कवितेत विषयांची भरपूर विविधता आहे. कविता वाचताना जणू काही कवी आपल्याशी सहज सुलभ ओघवत्या पण काव्यरूपी भाषेतून संवाद साधतोय असं वाटतं. त्यांनी वेगवेगळ्या कवितांतून व्यक्त केलेल्या विचारसरणीतून त्यांच्या व्यक्तिमत्त्वावर प्रकाश पडतो. काही काही कवितातून मात्र सर्वसाधारणपणे समाजाला परिचित नसलेल्या शब्दांचा वापर आढळून येतो, उदाहरणार्थ-मुगारे, चांदई, चिंदुक, ठेपे, बहाला, सालगिरा, संदुका, पन्नगा, काद्रवेय, क्षुत्तृष्णाविकला, ओखद, रत्नोष्ट, अब्दाला, दृक्शरा, नीलाम्बुधीभीतरी इत्यादी. अशा शब्दांचे अर्थ एक तर शब्दकोशात बघावे लागतील किंवा कवितेच्या आशयानुसार ते तर्काने ओळखावे लागतील.

कवी यशवंत तसे भाग्यशाली कवी. त्यांच्या कवितासंग्रहाच्या पाच पाच आवृत्या निघण्याचे भाग्य त्यांना लाभले, यावरून हा कवी किती लोकप्रिय होता हे लक्षात यावे; असे भाग्य फार थोड्या कवींना लाभते. त्यांच्या यशाची कमान सतत वाढतीच होती. बडोदा संस्थानचे महाराज प्रतापसिंह गायकवाड यांच्या राज्यारोहण सोहळ्याचे यथार्थ दर्शन घडविण्यासाठी त्यांनी लिहिलेल्या 'काव्यकिरीट' या काव्यसंग्रहावर महाराज खुष झाले व तेव्हापासून ते 'राजकवी' म्हणून ओळखले जाऊ लागले. पुढे संयुक्त महाराष्ट्र निर्मितीनंतर महाराष्ट्र शासनानेही त्यांचे काव्य क्षेत्रातील मोठेपण ध्यानात घेऊन त्यांना 'महाराष्ट्र कवी' म्हणून सन्मानिले. रविकिरण मंडळात जरी अन्य कवी होते तरी लोकप्रियता व गौरव फक्त कवि यशवंताचाच झाला. त्यांचे काव्यगायनाचे असंख्य कार्यक्रम व एच.एम.व्ही.च्या त्यांच्या काही कवितांच्या ध्वनिमुद्रिका यामुळे त्यांच्या काव्याला चांगली लोकप्रियता लाभली. त्यांच्या कविता त्याकाळी अनेकांच्या ओठावर असत. आजही त्या जुन्या मंडळींच्या स्मरणात आहेत. त्यापैकी काही कविता आठवतात त्या म्हणजे, 'पाणपोई', 'आई' 'मैतरिणी बिगीबिगी चाल,' 'तुरुंगाच्या दारात', 'गाऊ त्यांना आरती', 'वंदन तुज मातृभूमि' 'किणकिणती रातकिडे', 'द्या आम्हाला

सुळी', 'जगा तुझी सारी तऱ्हा' इत्यादी.

रविकिरण मंडळात त्यावेळी श्री.बा.रानडे, मनोरमाबाई रानडे, माधव जुलियन, यशवंत, गिरीश, दिवाकर, ग.त्र्यं. माडखोलकर, द.ल. गोखले वगैरे मंडळी होती. मात्र कवितेच्या बाबतीत महत्त्वाचे योगदान कवि यशवंत, माधव जुलियन व गिरीश यांनीच दिले. प्रत्येकाचा पिंड वेगळा. कवि यशवंत आदर्शपणा, कौटुंबिक प्रश्न, स्वातंत्र्यावरील कविता, अन्यायाचा निषेध, वगैरे गोष्टींवर कविता करण्यात रमले तर माधव जुलियन हे गझल, प्रेमावरील कविता तसेच नवे नवे प्रयोग करण्यात रमले.

यशवंतांची संपूर्ण कविता वाचल्यानंतर विषयांची विपुल विविधता पाहून मन थक्क होते. काही विषय तर असे आहेत की, अशा विषयांवर कविता कशी होऊ शकेल अशी शंका आपल्या मनात सहज निर्माण व्हावी. पण कवी यशवंतांनी ही किमया करून कवी कोणत्याही विषयावर कविता करू शकतो हेच जणू दाखवून दिले आहे. त्यांच्या काही कवितांची शीर्षके पहा म्हणजे या म्हणण्याची आपणास खात्री पटेल. उदा. 'वसंत आणि भडमुंजा', 'हत्तीची प्रभात फेरी', 'रुळ आणि माळ', 'उभी मी टेकडी','कुत्रा आणि आगगाडी', 'वरणीतील फुले', 'व्यासपीठावरील चिमणी' इत्यादी.

विमानावर इतरांनी कविता केल्या आहेत हे मान्य करूनही कवीने विमानाला उद्देशून केलेल्या कवितेचा आशय थोडा वेगळा आहे. कवी म्हणतो, 'अरे विमाना, तू सदैव आकाशातून उड्डाण करतोस. जमिनीवरून नाही, कारण बहुधा रस्त्यावर येणारे आंधळे, पांगळे, झिंगलेले, पोलिसांचे हात, सिग्नलांचा



**कवि यशवंत- यशवंत दिनकर पेंढरकर**

*जन्मस्थळ : सातारा जिल्ह्यातील चाफळ येथे ०९.०३.१८९९ रोजी जन्म.*

*शिक्षण : सांगली येथे. प्रथम लाभलेले गुरु : साधुदास (गोपाळ गोविंद मुजुमदार)*

*सुरवातीस लेखन 'तारकानाथ' या टोपण नावाने. १९२१ साली बडोदा येथील साहित्य संमेलनात कविता वाचण्याची संधी. त्याला उत्तम प्रतिसाद. तेव्हापासून 'यशवंत' या नावाने कविता लिहू लागले.*

*वडोदा संस्थानाच्या महाराजांच्या राज्यारोहण समारंभावर 'काव्यकिरीट' हा काव्यसंग्रह लिहिला. तेव्हापासून महाराजांनी त्यांना 'राजकवी' हा किताब दिला. संयुक्त महाराष्ट्र निर्मितीनंतर शासनाने 'महाराष्ट्रकवी' हा किताब देऊन गौरविले.*

*ग्रंथसंपदा : काव्य - मित्र प्रेम रहस्य, तुटलेला तारा, यशवंती, यशोधन. भावमंथन, बंदिशाळा, जयमंगला, यशोगंध, यशोनिधी, यशोगिरी, काव्यकिरीट, ओजस्विनी, वाकळ, पाणपोई, छत्रपति शिवराय.*

*गद्य : प्रापंचिक पत्रे, घायाळ, कांतपणीचे घर.*

*बालवाङ्मय : मोतीबाग, दरोडेखोर छे देवदूत, भगवी गीता, चाणाक्ष न्यायाधीश, रंजना, अमलांगी, अनंग-वासंती*

*निधन : २६/११/१९८५*

अडथळा, लग्नाच्या अथवा राजकीय पक्षांच्या मिरवणुका यांच्या अडथळ्यांमुळे तुला स्वैर भरारी मारण्याचा आनंद मिळत नसावा, कारण तुझे धावणे म्हणजे—

*'जाशिल तिकडे मार्ग खुला*
*रोधिल तेथे कोण तुला*
*चाकोरीची गरज नसे*
*अनुकरणाची सक्ती नसे*
*भ्रमणालागी हद्द नसे*
*तिज तंत्राविण बंध नसे'*

असलं स्वातंत्र्य तुला उपभोगता येतं हे खरं असलं तरी हे ध्यानात ठेव की अखेर जेव्हा तुला थांबायची इच्छा होईल तेव्हा मात्र एका जमिनीशिवाय तुला दुसरा आधारच नाही.

'व्यासपीठावरील चिमणी' हा अेक वेगळा विषय. व्यासपीठावर येणाऱ्या चिमणीला कवी विचारतो - तू स्वत: भीरू असूनही एवढी धीट कशी झालीस? ही व्यासपीठावर चालणारी श्रेष्ठांची व्याख्याने ऐकून ही मंडळी म्हणजे केवळ बोलघेवडे पोपट आहेत असं तुला वाटतं का? पण या श्रेष्ठांवर उधळलेल्या फुलांच्या पाकळ्या मात्र तू पटकन उचलून घेतेस आणि श्रोत्यांना दिलेल्या टाळ्या ऐकून भुर्रकनच उडून जातेस. अशी ही थोडी गमतीदार कविता.

यशवंताची कविता कौटुंबिक जीवनाशी जवळीक साधून आहे. तसेच तिच्यात विचारांचा सरळपणा आहे, ती आदर्शावर प्रेम करणारी, अन्यायाबद्दल चीड व्यक्त करणारी अशा स्वरूपाची आहे. ग्रामीण ढंगात त्यांनी काही कविता लिहिल्या असल्या तरी त्यांची संख्या अल्प आहे. प्रसादयुक्तता, भाषेची सुलभता, सुयोग्य उपमा, कल्पनारम्यता, अशाही काही गुणांचे अधून मधून दर्शन घडते.

गेयता, छंदोवद्धता हा त्यांचा कवितेचा स्थायीभाव आहे. मुक्तछंदातील कविता अभावानेच आढळून येईल. गेयतेमुळे बऱ्याच कविता गाऊनही म्हणता येतात.

त्यांच्या 'पाणपोई' या कवितासंग्रहात त्यांच्या आधीच्या काही संग्रहातील कवितांचाही अंतर्भाव आहे. या कविता संग्रहात कवीने रसिकांच्या दृष्टीने सोयीस्कर कवितांचे वर्गीकरण केले आहे. सहा विभागातील हे वर्गीकरण पुढीलप्रमाणे आहे. (१) कौटुंबिक (२) सामाजिक (३) प्रेमविषयक (४) संकीर्ण (५) आत्मदर्शी (६) ध्येयदर्शी. एकूण सर्व संग्रहांचा विचार केला तरी या वर्गीकरणाच्या बाहेरचे वाटतील असे अन्य काही विषय कवी यशवंतांच्या एकूण काव्यसंभारात आले नसावेत. 'पाणपोई' या संग्रहाला लाभलेली वि. स. खांडेकर यांची प्रस्तावना ही सुद्धा रसिक वाचकांच्या दृष्टीने एकूण काव्यावर उत्तम प्रकाश टाकणारी आहे. या संग्रहाचा विचार करताना यशवंताची 'आई' कविता ठळकपणे लक्षात राहते. त्याकाळीही ती अतिशय लोकप्रिय झाली होती. आजही ही कविता वाचताना कवीच्या प्रतिभेची भरारी व आईचे श्रेष्ठत्व सांगणाच्या कल्पनांची उंची मोठी वाटते. या कवितेची गोडी कदापि कमी होणारी नाही. मुळात 'स्वामी तिन्ही जगाचा आईविना भिकारी' ही एकच ओळसुद्धा आईची थोरवी उत्तमरीतीने व्यक्त करते, ज्याला आईचे सुख लाभले नाही ती व्यक्ती दुर्दैवीच. आपल्या

**म.पां. भावे (मधुसूदन पांडुरंग भावे)**



*(व्यवहारात सर्वजण 'मपां' म्हणून संबोधतात.)*
*जन्मतारीख : २५ मार्च १९२४.*
*४६, आनंदाश्रम कॉलनी, शिवाजी नगर, नौपाडा, ठाणे ४०० ६०२.*
*गीतकार व कवी म्हणून प्रसिद्ध. १४ पुस्तके प्रकाशित. १) आपला देश आपलं वागणं (नवप्रौढांसाठी : भारत सरकार पुरस्कार). २) भंपकपुरीचा फेरफटका (लोकनाट्य). ३) गीतकृष्णायन (श्रीकृष्णाचं जीवन चरित्र). ४) अचूक निवड (कुमारकथा). ५) मसालापान (विनोदी कविता). ६) अबोली (कथासंग्रह). ७) असा मी काय गुन्हा केला (कादंबरी). ८) रामकृष्ण संगीत गाथा (रामकृष्ण परमहंसांचं जीवनचरित्र) ९) श्री गजानन विजयामृत (गजानन महाराजांनी संक्षिप्त पोथी). १०) स्वप्नातल्या कळ्यांनो (भावगीत संग्रह). ११) श्री सार्थ रामायण (मराठी, हिंदी व इंग्रजी). १२) मला मोठं व्हायचंय् (शालेय विद्यार्थ्यांसाठी उपयुक्त पुस्तक). १३) अरे संसार संसार (विडंबन गीतांवर आधारित संगितीका). १४) भावकविता (भावगीत संग्रह)*
*दिवाळी अंकातून प्रसिद्ध : १) स्वप्न तू विसरून जा (कादंबरी), २) चांदणे अंधारले (कादंबरी), ३) विवेकानंद जयगान (विवेकानंदांचे गीतमय चरित्र)*
*ध्वनिमुद्रित गीते : H.M.V. कंपनीने केलेली : १) स्वप्नातल्या कळ्यांनो (गायिका : आशा भोसले), २) कृष्णा पुरेना थट्टा कितीही (गायिका : माणिक वर्मा), ३) मज एकसारखे स्वप्न सख्याचे (गायिका : माणिक वर्मा), ४) पाहतेच वाट तुझी (गायिका : माणिक वर्मा), ५) गोड बोलून माज्यासंग, औंदा लगीन करायचं इ. ५ लावण्या (गायिका : सुलोचना चव्हाण)*
*प्रसिद्ध कॅसेटस् : १) भक्तिगीते २) स्वप्नातल्या कळ्यांनो ३) पंढरीचा नाथ ४) गीतसुगंध*
*उषा मंगेशकर, जयवंत कुलकर्णी, विठ्ठल शिंदे, गोविंद पोवळे, दशरथ पुजारी, रंजना जोगळेकर, अनुप जलोटा, अनुपमा देशपांडे, रवींद्र बिजूर, आशिष देसाई, कविता कृष्णमूर्ती, संजिवनी भिलांडे, मिलिंद जोशी, रवींद्र साठे, अजित कडकडे इत्यादि गायकांनी आकाशवाणी आणि दूरदर्शनवर गीते गायिली.*
*'आपण ह्यांना पाहिलंत का' या चित्रपटासाठी काही गीते लिहिली. 'शब्दांगण' मासिकाचा प्रथम सहाय्यक संपादक, नंतर कार्यकारी संपादक. 'मनोयुवा' त्रैमासिकाचा सहाय्यक संपादक.*

मुलाचे संगोपन, रक्षण, चारित्र्य घडविण्यासाठी आई किती जागरूक असते हे सहज सुलभ मांडणीतून त्यांनी खूपच प्रभावीपणे मांडले आहे. कवी म्हणतो —

*'आई तुझ्याच ठायी सामर्थ्य नंदिनीचे*
*माहेर मंगलाचे, अद्वैत तापसांचे*
*गांभीर्य सागराचे, औदार्य या धरेचे*
*नेत्रात तेज नाचे, त्या शांत चंद्रिकेचे*
*वात्सल्य गाढ पोटी, त्या मेघमंडळाचे*
*वास्तव्य सद्‌गुणांचे, आई तुझ्यात साचे'*

इतकी सुरेख आईची थोरवी अन्य कुणा कवीने केली नसावी. ही कविता वाचताना भावनिक मनुष्याच्या भावना उचंबळून येतात. जनमानसात त्यामुळेच ही कविता महत्त्वाचे स्थान मिळवून राहिली आहे.

दुसऱ्या एका कवितेत आईची महती त्यांनी यथार्थतेने रेखाटली आहे. आपल्या बाळाच्या हितासाठी, सुखासाठी, तिचे मन किती जागरूक असते. क्षणाक्षणाला त्याचाच विचार तिच्या मनात कसा घोळत असतो याचे त्यांनी केलेले अगदी वास्तव वर्णन आपल्या मनाला सहज भिडून जाते. आई दुसऱ्याला सांगताना म्हणते - 'अहो माझ्या बाळाला नीट घ्या, धसमुसळेपणाने घेऊन त्या कोमल जीवाचे हाल करू नका. पुढील ओळीतून ह्या भावना छान व्यक्त होतात. बाळाला कसं घ्याल हे सांगताना ती म्हणते —

*'नका घेऊ गडे अशी धसमुसळेपणाने*
*घ्यावी गुलाब पाकळी किती नाजुक हाताने'*

इथे गुलाब पाकळीची कल्पना अगदी सुयोग्य अशीच आहे. गुलाबाचे फूल जसे आपण हळुवारपणे हाताळतो, त्याच्या पाकळी पाकळीला जपतो, त्याचप्रमाणे त्या बाळालाही तितक्याच हळुवारपणाने जपायला हवे, असे ती म्हणते इतकंच नव्हे तर ती बाळाबद्दलच्या अतीव प्रेमामुळे पुढे असेही म्हणते की —

*'नको सोडू भंडावून मुके सारखे घेऊन*
*खदखदा खिदळून बाळ होईल हैराण'*

एकूणच आईच्या हळव्या मनाचे चित्रण इतक्या सहजतेने परंतु यथार्थतेने केलेले अन्य कुठे आले नसेल.

या ठिकाणी कवी यशवंतांचे समकालिन माधव जुलियन यांचीही मला आठवण येते. कारण 'आई' संबंधी जुलियनांची कविताही तशी पुष्कळांना माहीत आहे. ती कविता म्हणजे 'प्रेमस्वरूप आई, वात्सल्यसिंधु आई.' निदान सुरवातीच्या ओळी तरी अनेकांच्या कानावरून गेल्या असतील. दोघांनीही आईची थोरवी गायिली आहे. आईविना जीवन कसे नीरस हे सांगण्याचा प्रयत्न केला आहे. खरं म्हणजे दोघांच्या कवितेबद्दल तुलनात्मक दृष्ट्या विचार करणे इष्ट नसले तरी यशवंतांच्या आईने जनमानसाची जी पकड घेतली तितकी जुलियनांच्या कवितेने घेतली नाही. या दृष्टीने विचार करताना एक गोष्ट लक्षात येते ती ही की यशवंत सर्व

सामान्यांच्या अनुभवास येणाऱ्या अनुभवाचा आधार घेऊन आईचे श्रेष्ठत्व सहजपणे सांगतात तर जुलियन यांची भावना जरी तितकीच आत्मीयतेची असली तरी तिची थोरवी गातांना सर्वसामान्यांना पटकन रुचेल अशा पद्धतीने लिहिण्याऐवजी ते म्हणतात —

*'गेली दुरी यशोदा टाकून येथ पान्हा*
*अन् राहिला कधीचा तान्हा तिचा भुका का'*

किंवा

*'नैष्ठुर्य त्या सतीचे तू दाविलेच माते*
*अक्षय्य हत्प्रभूचे सामीप्य साधण्याते'*

या रचनेमुळे सर्व सामान्यांना कविता तितकीशी भावत नाही. उलट यशवंत किती सुलभतेने लिहितात ते पहा —

*'चारा मुखी पिलांच्या चिमणी हळूच देई*
*गोठ्यात वासरांना ह्या चाटतात गाई*
*वात्सल्य हे पशूंचे मी रोज रोज पाही*
*पाहून अंतरात्मा व्याकूळ हाय होई*
*वात्सल्य माऊलीचे आम्हा जगात नाही*
*दुर्भाग्य याविनाका आम्हास नाही आई'*

अशी साध्या व पटणाऱ्या उदाहरणांनी केलेली मांडणी सर्व सामान्यांना आपली ना वाटेल तरच नवल.

यशवंतांच्या यशाचे खरे मर्म यातच आहे असे मला वाटते.

बाळाबद्दलचे आईचे वात्सल्य-प्रेम वर आलेच आहे. तसेच 'बालका असाच झोप' या कवितेत ती बाळाला एक छानसा उपदेशही करते. त्याला अंगाई गीत गाताना ती त्याला सांगते, माझ्या लाडक्या बाळा, एवढ्यात उठण्याची घाई करू नकोस, छानपैकी झोपून रहा, कारण या जगात धडपणे निजायलाही जागा नाही. सगळीकडे आनंदी आनंदच आहे. योग्य काही करण्याऐवजी अयोग्य असे करणारांचीच चढती कमान इथे आहे. म्हणून तू एवढ्यात उठू नकोस कारण झोपेसारखे निर्मळ सुख तुला जागेपणी मिळणार नाही. १९४७ च्या आसपासची ही कविता पण सद्यस्थितीलाही लागू पडणारी अशीच आहे. कारण आताची परिस्थितीही इष्टापेक्षा अनिष्टांनीच पुरेपूर भरलेली आहे.

पाळण्यातील बाळाच्या हालचाली, हाताचे चाळे, ते करताना हवे ते हाती गवसत नाही म्हणून होणारी ओढाओढी, यश न आल्याने त्याचे रडणे या सर्व हालचालींचे समर्पक चित्रण त्यांच्या 'चिमुकल्या वसंतास' या कवितेत वाचावयास मिळते. 'लेकरांचे विध्वंसन सुख' या कवितेत बाळाच्या खोड्यांचे वर्णन छानपैकी रंगविलेले आहे.

'मोक्षाची दारे' या कवितेत छोट्या बाळाचे अर्धस्फूट वदन म्हणजे जणु काही पवित्र असे मोक्षाचे दारच आहे अशी सुंदर कल्पना मांडली आहे.

कवी म्हणतो अशा मुखाचे चुंबन घेणे मला शोभणार नाही, कारण माझ्या मुखातील वाचा

पवित्र नाही. अश्लीलता, खोटे बोलणे, लाचारी, अशा दुर्गुणांनी ते अपवित्र आहे म्हणूनच या निष्पाप बालकाच्या मुखाचे चुंबन घेण्याचा मला काहीही अधिकार नाही अशी ही खास वेगळी पण रम्य कल्पना.

मध्यमवर्गीय कुटुंबाचे नातेसंबंध, अपेक्षा, त्यांची विचारसरणी या सर्वांचे मार्मिक चित्रण त्यांच्या कौटुंबिक स्वरूपाच्या काव्यातून ठळकपणे जाणवते. आपल्याकडे अशी प्रथा आहे की मुलगी लग्न होऊन सासरी गेल्यानंतर मुलीचा बाप, तिच्या घरी जात येत असला, तरी तिला मूल झाल्याशिवाय तो तिच्या घरी जेवत नसे. सध्याच्या काळात आता ही प्रथा कोणी पाळत नाही, कारण शास्त्रीय दृष्ट्या त्यात काही तत्त्व आहे हे कोणी मानत नाही. ही प्रथा पूर्वी रुढ होती. अशावेळी, आपला बाप आपल्या घरी येऊनही, केवळ मूल झाले नाही म्हणून, तो न जेवताच परत जातोय, यामुळे मुलीच्या मनाला होणाऱ्या वेदना 'मातृपदाविण' कवितेत यशवंतांनी योग्य तऱ्हेने व्यक्त केल्या आहेत. मुलगी म्हणते ––

*'ते अशुभ जसे ग देऊळ शिखराविना*
*नच चंद्रावाचुन शोभा तारांगणा*
*मज निष्फळ तैसा गमतो हा स्त्रीपणा*
*मम तात घरी या येऊनी जाती भुके'*

कोणत्याही मुलीच्या मनात अशा प्रसंगी याच भावना येत असतील यात शंका नाही.

घरोघरी मातीच्या चुली या म्हणीप्रमाणे पती-पत्नीच्या संबंधात पतीचा वियोग काही काळ तो अनुभवण्याची पाळी पत्नीवर येतच असते. अपेक्षेपेक्षाही पतीला परत येण्यास विलंब झाला तर पत्नीच्या मनाची घालमेल सुरू होते. ती अतिशय आतुरतेने त्याच्या येण्याची वाट पाहात असते. जरा कुठे दार वाजले, तर लगेच तिला पतीच परत आला असावा असे वाटते. केस विंचरता विंचरता उदासीनतेमुळे, त्याच्या आठवणीत मग्न झाल्यामुळे, तिच्या हातून फणीसुद्धा गळून पडते, न्हाण्यासाठी उपसलेले पाणीसुद्धा गार होते इतकं तिचं वेडं मन त्याच्या ध्यासात मग्न झालेलं असते. या कवितेतील तिच्या मनाची भावनिक उत्कटता सुलभ सोप्या रचनेतून छानपणे रंगविली आहे. रचनेची सफाई, चित्रणाची अचूकता, शब्दांचा ओघवतेपणा यामुळेच यशवंतांची कविता सर्व सामान्यांनासुद्धा जवळची वाटते. जे नित्य अनुभवास येतं ते मार्मिकपणे कवितेतून व्यक्त करण्यात 'यशवंत' यशवंतच ठरले आहेत.

'पाणपोई' ही यशवंतांची गाजलेली कविता. या कवितेत कवी म्हणतो-मी घातलेली ही पाणपोई सर्व जातीतल्या लोकांसाठी आहे. कुणाही तहानलेल्या माणसाने यावे आणि हे पाणी पिऊन तृप्त व्हावे. या पाणपोईपासून मला काय फायदा मिळेल हे त्यांनी या कवितेतच स्पष्ट केले आहे.

*'ओंजळी दो ओंजळी, आकंठ घे पिउनी*
*हो जरा ताजा तवाना, येऊ दे सामर्थ्य पायी*
*पावता तृप्ती·मना, संचारता अंगी उमेदी*
*जो दुवा देशील पांथा, तेवढी माझी कमाई'*

तृप्त झालेल्या तहानलेल्या पांथाकडून जो दुवा मला मिळेल तीच माझी खरी कमाई.

'अंधत्व' या शीर्षकाच्या दोन कविता यशवंतांनी लिहिल्या आहेत आणि त्यातून अंधत्वापासून मिळणारे फायदे आणि अंधत्वापासून होणारे तोटे असे विचार या दोन वेगवेगळ्या कवितेतून मांडले आहेत.

जर मला अंधत्व आले तर या जगातले जे जे सुंदर आहे, जे जे उदात्त आहे त्या साऱ्यांना मी मुकेन. ते मला दिसणार नाही त्यामुळे मी त्याचा आस्वाद घेऊ शकणार नाही. असले वेचव जिणे जगण्यापेक्षा मरण आलेले परवडले असा विचार पहिल्या कवितेत आहे. तर दुसऱ्या कवितेत या अंधत्वाचा मी चांगल्या तऱ्हेने उपयोग करीन असा आशावादी, उदात्त निर्धार त्यातून व्यक्त केला आहे. मी गाणे गाऊन म्हणजे माझ्या कलेद्वारे लोकांना रिझवीन, या जगातील वाईट असं मला काही दिसणार नाही त्यामुळे मोहाचे, पाप-वासनेचे विचार माझ्या मनात येणार नाहीत म्हणूनच हे अंधत्व माझ्या हिताचेच ठरेल असा आशावादी दृष्टीकोन व्यक्त केला आहे.

कवी यशवंतांनी ग्रामीण ढंगांच्या काही कविता लिहिल्या आहेत. तशी ग्रामीण कवितांची संख्या अल्पच आहे. 'किरकिरती रातकिडे' ही त्यांची गाजलेली कविता. वर ज्याप्रमाणे शहरी पत्नीची पती वियोगाच्या वेळी होणारी मनाची घालमेल एका कवितेतून व्यक्त केली आहे त्याप्रमाणे दूर गेलेला पती आला नाही म्हणून या ग्रामीण भगिनीची पतीच्या येण्याची वाट पहात असताना होणारी उत्सुकता यात व्यक्त केली आहे. यशवंतांच्या अन्य ग्रामीण कविताही लोकप्रिय झाल्या आहेत. त्यांच्या काही कविता त्याकाळी एच.एम.व्ही ने ध्वनिमुद्रितही केल्या होत्या. 'न्याहरीचा वखत होईल मैतरिणी विगिबिगी चाल' हे गाणे मामा वरेरकरांनी त्यांच्या 'स्वयंसेवक' या नाटकात घेतलं होतं. ध्वनिमुद्रिकेतील त्यांची गाणी सुप्रसिद्ध गायक श्री. जी.एन.जोशी यांनी गायिली होती. बहुतेक ध्वनिमुद्रित गीतांना खूप चांगली लोकप्रियता लाभली.

'नांगरखुंटी सोन्याची' व 'शेतकीतील सुख' अशा आणखी दोन कविताही ग्रामीण ढंगात आहेत. 'नांगरखुंटी' कवितेत वर्णिलेल्या त्याकाळच्या परिस्थितीत आजही काही फरक पडलेला नाही. या कवितेत यशवंत लिहितात —

*'आम्ही सांप्रत पाहतो कृषिक हा अर्ध्याच पोटी जगे*
*वस्त्राला कुठला घरात अडका? कर्जात शेती रुते*
*फेडाया वर व्याज जात विकले ते बैल तो नांगर*
*रस्ता मुंबईचा धरून मरणा देतोच आमंत्रण'*

'शेतकीतील सुख' या कवितेतील कल्पना खास वेगळी आहे. त्यात त्यांनी शहरी सुखोपभोगाच्या सुविधापासून मिळणाऱ्या सुखांपेक्षा निसर्ग सानिध्यातील शेतीचे सुख कितीतरी पटीने श्रेष्ठ आहे हे कवीने या कवितेतून व्यक्त केले आहे. शेताभवतालची दृश्ये, पिके तयार झाल्यावर दिसणारे ते वैभव, उघड्या शेतजमिनीवर बसून कांदा-भाकर खाण्यातील गोडी, आजूबाजूला वावरणारी इमानी कुत्री, वरचे निळेभोर आकाश, रात्रीचे लख्ख चांदणे, मोटेचा

खळखळणारा आवाज, बैलांच्या घुंगरांचा आवाज या साऱ्या गोष्टींपासून मिळणारा आनंद काही वेगळाच आहे.

'कर्तव्य आणि कर्म' ही कवितासुद्धा शेतकऱ्यास उपदेश करणारी आहे. कवी सांगतो, 'हे शेतकऱ्या, नांगरताना जमिनीत खजिना सापडेल या आशेवर राहू नकोस. शेती करून पिकाचे सोने निर्माण करणे हेच तुझे खरे काम. तुझ्या सारखाच मीही संसारातील शेतकरीच आहे. या संसारात 'कर्तव्य आणि कर्म' यांचा नांगर हाती घेऊन मी या संसाररूपी शेतीची मशागत करीत असतो. थोडक्यात प्रत्यक्ष काम करून जे हाती येईल तेच खरं आपले धन. खोट्या आशेवर माणसाने राहू नये हा भावार्थ.

कवी यशवंताचे विचारधनही त्यांच्या वेगवेगळ्या कवितांतून स्पष्टपणे प्रगट होते. किंबहुना हे विचार यशवंतांच्या व्यक्तिमत्त्वाचेच दर्शन घडवितात. 'हि पुन्हा न येईल वेळ' या कवितेत प्रत्येकाने वेळ न दवडता आलेल्या संधीचा वेळीच फायदा करून घ्यायला हवा अन्यथा बैल गेला नि खोपा केला असा प्रकार होईल हा विचार समर्पक उदाहरणांनी त्यांनी प्रगट केला आहे.

आयुष्यातील खरी चिरंजीवता कोणती हे सांगताना यशवंत म्हणतात —

*'सत्कृती गुणे, आयु मापणे, हा ध्यास हवा'*

आणि शेवटी -

*'जगताच्या बुरुजावरी*
*ज्या स्तवील युगवैखरी*
*ती चिरंजीवता खरी'*

असं जीवन जगणे ही खरी चिरंजीवता होय.

त्यांच्या मते, माणसाने गुलामगिरीची बंधने तोडून स्वत: मुक्तिमार्ग स्वीकारायला हवा. त्याने स्वत:च आपल्याभोवती बंधनाची शृंखला उभारलेली असते म्हणून यशवंत म्हणतात —

*'निर्मिली तुझी तुवाच ही अभेद्य (?)कारा*
*तूच तुझ्या शृंखलास एक तोडणारा'*

प्रत्येकजण आपल्या मनाशी सुंदर, सुखद स्वप्ने रंगवीत असतो. कवी यशवंतही त्याला अपवाद नव्हते. त्यांनी अशी ही, सुखद स्वप्ने 'हे मिळेल का कधी' या कवितेतून छानपणे रंगविली आहेत. पण सबंध कविता वाचल्यावर मनात येतं की ही सुखद स्वप्ने, रंगविलेले वैभव कधीतरी कुणाच्या वाट्याला येईल का? अर्थातच उत्तर नकारार्थीच येणार. शेवटी ती स्वप्नेच आहेत पण ती रंगविली आहेत मात्र झकास.

'श्रेष्ठांच्या संगतीत' या कवितेत श्रेष्ठत्वाबद्दल कवीचे मत असे आहे की श्रेष्ठत्व हे श्रीमंतीत नसते तर ते कशात आहे हे त्यांच्या खालील ओळीतून स्पष्ट होते —

*'माझ्या ग़रिबाच्या गेही*
*तैशी शोभती पुस्तके*
*ग्रंथपंगती ह्या गेही*
*दीपमालिका तेवती'*

त्यांच्या मते श्रीमंतीच्या थाटापेक्षा उत्कृष्ट ग्रंथांची घरात चकाकणारी प्रकाशमय मालिकाच जास्त श्रेष्ठ होय.

मुलांवर चांगले संस्कार करावेत तेही प्रेमाने. छडीचा उपयोग त्यांना मान्य नाही. त्यांच्यामते बालमने कोवळी असतात. त्यांच्यावर कठोरतेपेक्षा हळुवारतेने संस्कार करणेच आवश्यक म्हणून 'पंतोजींची छडी' या कवितेत पंतोजींना उद्देशून कवी म्हणतात —

*'पुरेल साखर तिथे योजना कशास जहराची*
*पंतोजीने छडी धरावी पुष्प परागांची'*

कवीचा हा विचार हृद्य असाच आहे.

ज्याला जीवनात यशस्वी व्हायचंय त्याने यत्नांची कास धरलीच पाहिजे. जीवन कसे जगले पाहिजे याची जाणीव कवीच्या पुढील दोन ओळीतून व्यक्त होते.

*'तुझ्या हाती सुवर्णाचे मिळावे मोल मातीला*
*हिऱ्याचे तेजही तैसे, चढावे गारगोटीला'*

पण असे कर्तृत्व घडवायला तीव्रतेने, तळमळीने प्रयत्नांची पराकाष्ठा करायला हवी. अशा व्यक्तीला मग ग्रहसुद्धा अनुकूल होतात, देवही धावून येतात अशी कवीची श्रद्धा आहे. या उलट —

*'मनोरे मानसी ज्यांच्या पायांना लोड आधार*
*तयांचा ऐकुनी टाहो, दया देवा न येणार'*

अशा ऐतखावू लोकांनी कितीही आक्रोश केला तरीही देवाला त्याच्याबद्दल दया येणार नाही. मात्र —

*'ग्रहांनी कुंडलीच्या त्या फिरावे कोष्टकामाजी*
*परी यत्नास जो राजी ठरे तो सर्वदा गाजी'*

अशा वेळी —

*'स्मरोनी आत्मकर्तव्या प्रयत्नांची करी रास*
*स्वये चोखळिती वाटा तयांचा देवही दास*
*दिसाया वाट अंधारी विजेचे तेज नेत्रासी*
*ग्रहांचे साह्य शूराला, यशश्री पायीची दासी'*

अशी ही कविता जीवनात ज्याला यश संपादन करायचंय त्याला प्रेरणा देणारी आहे.

समाजात जसे काही सज्जन असतात तसे खलपुरुष, दुष्ट प्रवृत्तीचे लोकही काही कमी नसतात. अशा दुष्टांची वृत्ती कशी असते, त्यांचे वागणे कसे असते, यासंबंधीचे मार्मिक वर्णन यशवंतांच्या कवितेत वाचावयास मिळते, खल कसे तर ...

*'उरी ज्वालामुखी पेटे, कढे पोटामध्ये लाव्हा*
*जियेच्या अग्रभागाला, मधाची मोहळे मोठी*
*परंतु डोंब आगीचा, तयांच्या पेटतो पोटी*
*सुखाच्या पूर्ण चंद्राने, जिथे फेसाळतो सिंधु'*

*तिथे हे येऊनी देती, विषाचा नेमका बिंदु'*

दुष्टांच्या वृत्तीने हे वर्णन समर्पक आणि यथार्थ नाही असं कोण म्हणेल?

कवी यशवंत आपले विचार व्यक्त करताना स्पष्टपणे म्हणतात 'मी सुखद घटनेने हुरळून जात नाही.'

*'माझा संतत जीव वंचित असा, वार्ता सुखाची जरी*
*कानी आदळली तरी हुरळतो आता न अभ्यंतरी'*

कारण जगात चांगले तसे वाईट, सुखद तसेच दु:खद प्रसंग घडतच असतात. या जगात —

*'आहे दुष्टपणा जगामधि तसे सौंदर्य नि सुष्टता*
*दु:खाच्या कढया इथे उकळती, सौख्याम्बुचेही झरे'*

विनम्रता हा एक गुण यशवंतांच्या ठिकाणी होता. आपल्या यशाचे श्रेय ते पूर्णपणे स्वत:कडे न घेता, या यशात ज्या अनेकांचे हात लागले आहेत, त्यांचाही उल्लेख ते आदराने करतात. 'श्रेयांचे वाटेकरी' या कवितेतून त्यांचे हे हृद्गत स्पष्टपणे व्यक्त झालेले आहे.

चांगले असलेले सबंध जर काही क्षुल्लक कारणावरून तुटले तर हे तुटलेले संबंध पुन्हा जुळून येणे जवळ जवळ अशक्यच होते. मात्र अशा वियोगात, मागील आठवणींनी मनाला फार क्लेश होतात. ह्या तुटलेल्या संबंधाबद्दल कवी यशवंत लिहितात — (कविता 'स्वप्न सौदामिनी')

*'चिकटतील का देहाभवती झडलेल्या पाकळ्या*
*प्रीतीच्या तुटलेल्या साखळ्या*
*पडलेली निखळुनी अंबरी चढे काय तारका*
*जुळेना तुटलेली तार का*
*त्याच जादुने भूषवूनी तनु का पुढती ठाकसी*
*मला चलबिचल कराया अशी'*

केवळ अशक्य ते शक्य कसे होणार हाच यातील भावार्थ.

कवी यशवंतांना स्त्रियांवर होणाऱ्या अन्यायाबद्दल मनातून चीड असे. 'कलंकिता' या सहा सुनीतामधे असलेल्या कवितेत काहीही अपराध नसताना बलात्कारित झालेली स्त्री, तिच्या भावना, समाजाच्या तिच्याबद्दलचा दृष्टीकोन, तो दृष्टीकोन कसा असला पाहिजे या संबंधीचे आपले विचार त्यांनी या कवितेत स्वच्छपणे मांडले आहेत.

हे विचार आजच्या काळातही लक्षात घेण्यासारखे आहेत.

अनेक सुनीतात एखाद्या विषयावर अथवा कथानकावर दीर्घकाव्य लिहिणे हे कवी यशवंतांचे खास वैशिष्ट्य आहे. अशा पद्धतीची दीर्घकाव्ये लिहिण्याचा खटाटोप सध्याच्या झटपट सर्व काहीच्या युगात कोणीही कवी करीत नाही. किंबहुना कवी यशवंतांच्या काळातही अन्य कोणा कवीने असे प्रयोग केल्याचे फारसे आढळून येत नाही. यशवंतांनी 'इंदुकला' हे काव्य १६ सुनीतात लिहिले आहे. अशी खंडकाव्ये वाचणे नि त्यावर काही लिहिणे हा एक स्वतंत्र लेखाचाच विषय होईल. तरीपण त्यातील ओघवती रचना, समर्पक भावदर्शनामुळे ती वाचणे

सुसह्य होते. 'प्रेमाची दौलत' यातही १२ सुनीते आहेत. 'जयमंगला' हे प्रेमकथेवर आधारलेले २४ भावगीतातून लिहिलेले दीर्घकाव्य. या कहाणीत गुरुशिष्या संबंधातून निर्माण झालेली प्रेमकथा रेखाटली आहे. गुरु नि शिष्या यांचे वय, बुद्धी, गुणसंपदा जर समान असतील तर अशा प्रसंगी त्यांच्यात प्रेम संबंध निर्माण होऊ शकतो असा यातील आशय आहे.

'मानवता किल्ल्याची ऐतिहासिक पर्वे' ही चार सुनीतातील दीर्घ कविता. तसेच 'शिवारातले दैवत' ही सात सर्गातील एक पद्यात्मक लघुकथाच आहे. 'बंदिशाळा' हे खंडकाव्य बालगुन्हेगारांच्या करुण स्थितीवरील काव्य. प्रतिभा-उपमा सौंदर्य, वत्सलता, कारुण्य नीती, इत्यादी भावभावनांचे दर्शन यातून घडते. बडोदे संस्थानच्या प्रतापसिंह महाराज गायकवाड यांना झालेल्या राज्यारोहण सोहळ्यातील ठळक प्रसंगावर लिहिलेले काव्य म्हणजे 'काव्य किरीट' हे काव्याचे स्वतंत्र पुस्तकच आहे. भव्यता, उत्कटता, अभूतपुर्वता, उपमा, अलंकार इत्यादि काव्यगुणांनी नटलेले हे काव्य वाचून महाराज यशवंतांवर खुष झाले व तेव्हापासून कवी यशवंत राजकवी झाले.

'अपरिचिताची ओढ' ही कविताही ४ सर्गात आहे. यात एकाकीपण अनुभवणाऱ्या माणसाच्या वेगवेगळ्या विचारांचे वर्णन केलेले आहे.

कवी यशवंतांच्या प्रेमविषयक कविताही वेगवेगळ्या कल्पनांनी नटलेल्या आहेत. त्यात विफलता आहे, विरह आहे, रुसवा फुगवा आहे, प्रेमाची कहाणी आहे, प्रियाराधना आहे असे प्रेमाचे वेगवेगळे पैलू त्यांनी आपल्या काव्यातून रंगविले आहेत.

प्रिया, आपल्याला सोडून गेलेल्या प्रियकराला सांगते, 'अरे, मी तर तुझ्या प्रेमासाठी आसुसलेली होते. त्या आसुसलेल्या भावनेत मी साहस करून तुला माझे सर्वस्व देऊन बसले पण तू मात्र इतका निष्ठूर झालास की माझ्या हातावर सोन्याची मोहर ठेवून निघून गेलास हीच का तू माझी किंमत केलीस. अरे, मी किती त्याग केला हे सांगताना ती म्हणते —

*'तुझ्या संग सुखासाठी, केले असभ्य साहस*
*म्हणुनीच कठोर का, केलास हा उपहास*
*रोमारोमातून माझ्या ऐशी फुटली आरोळी*
*कोण देहाते सांभाळी, घोर माजला कल्लोळी*
*दाटु लागल्या काळोखी, एक चमके किरण*
*केला हिय्या ओघालागी, देहे बांधाया धरण*
*आणि काल अवचित, पडे पदरी वांछित*
*आले फळास की माझे जन्मोजन्मीचे संचित'*

पण तुला याची काहीच किंमत नाही. तू फक्त बाजारी व्यवहार केल्यासारखा वागलास, असे तिच्या उद्विग्न भावनांचे चित्रण या कवितेत जाणवते.

या उलट 'फिरस्त्याचे गाणे' या कवितेत प्रियकराची, तिच्या म्हणजेच प्रेयसीच्या विरुद्ध खास तक्रार आहे. तो म्हणतो, खरं म्हणजे स्त्रीहृदय इतकं निष्ठुर कसं होऊ शकते?

तिने त्याच्याशी असं का वागावे हेच त्याला कळत नाही.

तो म्हणतो —

*'एकवार तरी पहावयाचे होते मुरडून*
*निर्दयतेने तुझ्या हृदय हे गेले चुरडून*
*स्त्री हृदयामधि निर्दयता ती आली तरी कुठली*
*कुंदकळ्यातुनि घाणेरीची दुर्गंधी सुटली*
*स्त्री हृदयाचा विपरीत अनुभव दिलास तू कागे*
*कठोर वर्तन हे का करिशी तू कसल्या रागे '*

या उलट —

*'प्रीती स्त्री हृदयास भूषण खरे, प्रीती जीवा जीवन*
*प्रीती हेच जगत तयात रमणे, ना ध्येय त्यावाचून'*

सहसा स्त्रीचे हृदय कोमल, आपुलकीने भरलेले असते. परंतु तूच अशी स्त्रीहृदयाच्या स्वाभाविक वृत्तीपेक्षा निराळी का वागलीस याचेच प्रियकराला कोडं पडलं आहे..

'शीलवती सुंदरीस' या कवितेतील स्त्रीच्या गात्रागात्रातून प्रगट होणाऱ्या सौंदर्याचे वर्णन फार छान केले आहे, त्यासाठी ती कविताच संपूर्ण वाचणे उत्तम.

'चमेलीचे झेले' या कवितेत प्रेमातील वियोगाचे वर्णन आहे. या वियोगाच्या आठवणी म्हणजे जणू शिलालेखच अशी कवीने कल्पना केली आहे. कवी म्हणतो —

*'आणा-भाक वचने तुझी ती-विसर तुला पडला*
*जपजाप्यासाठी आज ती परी मंत्रच मजला*
*भव्य उभविलेले हाय ते मनोराज्य विरले*
*झेलेनच हे, त्या काळचे शिलालेख उरले'*

म्हणजेच वियोगाच्या जुन्या आठवणी एखाद्या मंत्राप्रमाणे उगाळत बसण्याखेरीज आता काय उरलंय? त्या आठवणींना 'चमेलीचे झेले' म्हणण्यापेक्षा 'शिलालेख' म्हणणेच इष्ट अशी ही आगळी वेगळी कल्पना कवी यशवंतांनी या कवितेत मांडली आहे.

स्त्री जेव्हा रणांगणावर जाऊ लागली तेव्हा कवीला त्याकाळी स्त्रीचे हे वागणे फार धाडसाचे वाटले. खरं म्हणजे स्त्रीचा नाजूकपणा, हळुवार स्वभाव हे सारे लक्षात घेतलं तर अशा साहसाची परिणती कशी होईल असा प्रश्न कवीच्या मनापुढे उभा राहिला आहे, कवी लिहितो —

*'कोमलता रसनेची प्रकृती*
*नेत्र निरांजन स्नेहज्योती '*
*कनवाळुपणा हृदयी हाती*
*निघटुन पार त्या स्वभूषणा*
*चालली युवती वेधडक रणा*
*हरिणी होती काय वाघिणी*
*भाले पिकती शाद्वल कुरणी*

*स्फुरे उरोजी कृतांत करणी*
*ही मात विधात्यावरती म्हणा*
*उद्युक्त जाहली युवती रणा'*

स्त्रीचे रणांगणावर पाऊल हे थोडे आश्चर्यकारक वाटणे कवी यशवंतांच्या काळी ठीक होते. परंतु आता मात्र त्याबद्दल कुणालाही आश्चर्य वाटत नाही. कारण सध्या स्त्रीची प्रगती सर्वच क्षेत्रात वेगाने होत आहे.

एका गृहिणीची, जी मनाने पुरोगामी आहे, तिचे हृदय कवि यशवंतांनी 'गृहिणी मी, नच देवी' या कवितेत फार सुंदर रीतीने रेखाटले आहे. ती आपल्या नवऱ्याला म्हणते — मला सुखविण्यासाठी उगाच फार माया दाखवून मला दुबळी करू नका. मला पण तुमच्या सारखीच स्वकर्तृत्ववान होऊ द्या. या तिच्या मनोगताचे वर्णन कवीने पुढील ओळीतून व्यक्त केले आहे.

ती म्हणते —

*'दूर सरा, सुखवु नका, रिझवू नका, मज सखया*
*वाढविते माझ्यातील दुबळेपण तव माया*
*विकसाया वेलीवर फूल हवे ना सहजी?*
*तशि उन्हात पावसात डोलू द्या कलिका जी*
*अबला नच तुल्यबला होउ द्या मजलागी*
*संसारी दोघांची समसमान जरि भागी*
*तुमच्या इतुकेच मला वाहु दे शिरी ओझे*
*तनु होवो धर्मजले थयथयते कारंजे*
*झगडाया कष्टांशी पदर मला खोवू द्या*
*विघ्नांच्या नजरेशी नजर मला भिडवू द्या*
*घरकुलास कष्टांच्या दोघांच्या फुलमाळा*
*बांधाया येतील तरी तोच खरा सोहळा*
*त्यात शिळोप्याचा बसू बोलत मग गुजगोष्टी*
*आणि त्यातल्याही काही अडखळल्या जर ओळी*
*कळवाया त्या मजला वाटल्यास कुरवाळा*
*प्रीत तीच रिझवील, नच निगराणी, नच चाळा'*

अशी ही स्त्रीची पतीकडून रास्त अपेक्षा. फाजील लाडाने मी दुबळी होईन हे तिने पतीला स्पष्टपणे सांगितले.

पत्नीचे उत्तम सहकार्य लाभलेला भाग्यशाली नवरा आपल्या सहचारिणीबद्दल कशी कृतज्ञता व्यक्त करतो हे 'भाग्यशाली जोड' कवितेत अतिशय सहजतेने वर्णन केले आहे. तिच्या थोरवीचे वर्णन करताना तो म्हणतो —

*'जिण्याच्या सहारामधे माझिया तू सखे अमृताचे झरे निर्मिले*
*कटाहात संतप्त ह्या संसृतीच्या मला गारवा तू दिला अंचले*



अनुक्रमणिका

*शिखा अग्निच्या चाटता अंबुजांच्या, मला पाकळ्या सारख्या वाटल्या*
*धगीच्या झळा, लोट तैसे धुराचे जणु अत्तराच्या खुल्या बाटल्या*
*पराभूतिच्या इंगळ्या अंतराच्या जरी डंख मारावया लागल्या*
*सुधाभाषिणी! स्फूर्ती देवी! उतारा विखारापरी पूर्ण ठावा तुला*
*कुशी पोटिशी घेउनी कैकदा तू जणू लाविली चंदनाची उटी*
*तुझ्या प्रीतीच्या दिव्य मंदाकिनीला कधीही कधीही न येवो तुटी'*

संकटकाली, पराभूतीच्या झळा सोसताना, तुझ्या प्रेमळ वृत्तीने तू मला सांभाळून घेतलेस याची पतीला असलेली जाण या कवितेतून यथार्थतेने मांडलेली आहे.

'तुझ्या वाचुनी', कवितेतही अशीच कृतज्ञनेची भावना व्यक्त केलेली आहे. तो म्हणतो —

*'सन्निध तू वावरता, धूळहि हो स्नेहसुता*
*दयिता - गुण - गंधयुता, साक्ष इथे ती कुठुनी*
*नीर तेच तीर्थ होय पडता गोमुखातुनी'*

'पांथाचे गाणे' या कवितेत एक अत्यंत गरीब प्रवासी अेका रात्रीपुरता निवारा हवा म्हणून एका श्रीमंताकडे येतो. त्यावेळी तो गरीब पांथस्थ अत्यंत काकुळतीने श्रीमंत माणसाला विनंती करतो मला दुसरे तिसरे काही नको, फक्त आजच्या रात्रीच्या निवाऱ्यापुरती एका छोटाशा कोपऱ्यात जागा दे. तो म्हणतो —

*'थाटलेले ऐश्वर्य तुझ्या गेही*
*धक्का त्याला लव लावणार नाही*
*प्रतिष्ठेला तव बाधा न यावा*
*धोरणाने घेईन या विसावा'*

इतके सांगून तो पुढे म्हणतो —

*'नको भाजी भाकरी गूळ पाणी*
*कष्ट माझ्यास्तव घेऊ नये कोणी*
*असे पडशी माझिया स्कंद भागी*
*तीच उतरून घेईन उशाखाली*
*तुझ्या पडवीच्या फक्त कोपऱ्यात*
*मला क्रमु दे एवढी एक रात'*

गरीब मनाची नम्रता, सभ्यता, प्रामाणिकताही या कवितेत दिसून येते.

सारस्वताने सरस्वतीची आराधना केली नाही असे सहसा होत नाही. कवी यशवंत सरस्वती देवतेला उद्देशून म्हणतात —

*'ऊठ शारदे घे वीणा*

हे देवी इथे तर सर्वत्र असे दिसून येते की —

*एक सुराची नित्याची*
*क्षुद्रपणाची नित्याची*

*गाणी केवळ भवताली*
*घडामोड ही जगताची*
*श्रवुनि कान माझे किटले । मन अगदी विटुनी गेले*
*जरी फेकिली दृष्टी पुढे । मना शिसारी बहु येते*
*सौंदर्याची, सात्त्विकतेची,*
*नाविन्याची*
*सृष्टी पाहाया जाऊ वना । ऊठ शारदे घे वीणा'*

अशी ही शारदा देवीला केलेली अगदी वेगळी विनवणी.

कवी यशवंतांनी काही व्यक्तिविषयक, तसेच सारंगीवाला, कवी, दिवंगत कवयित्री, चित्रकार यांच्यावर कविता केल्या आहेत. व्यक्तिविषयक कविता या माधव जुलियन, बालगंधर्व व म. गांधी यांच्यावर आहेत.

म. गांधी या कवितेत यशवंत म्हणतात —

*'व्रत आचरिले जे काया वाचा मने*
*झेलिला मृत्युही अंती ज्या दिव्य व्रताकारणे*
*ते आकळिले अद्याप कुठे भारता?*
*अद्यापि जसाच्या तैसा तो रांजण गळका रिता*
*तो एक तयाचा खुनी*
*अवतार खुळ्याचे जनी*
*प्रकटले कसे ह्या क्षणी*
*तरि चिताभस्म मंडिता तुम्ही वाहुनी*
*जा पिकवित शिवसौंदर्या दुमर्तिंना प्रक्षाळुनि'*

आजही कवी यशवंतांनी व्यक्त केलेली खंत कायम आहे. म. गांधीच्या तत्त्वाबाबत, आचरणाबाबत आमचा रांजण गळका म्हणून रिता आहे. फक्त प्रसंग विशेष, स्वार्थीय राजकारणासाठी त्यांच्या नावाचा उद्‌घोष केला जातो इतकेच.

म. गांधींच्या खुनानंतर सर्वत्र दंगल उसळली आणि अनेक निष्पापांची घरे जाळण्यात आली, याची झळ कवी यशवंतानाही लागली. त्या संबंधात आपले विचार मांडताना यशवंत म्हणतात-तसं घर फार जुनं होतं, आर्थिकदृष्ट्या काही फार नुकसानीचाही प्रश्न नव्हता, पण मानवी जीवनाला प्रेरणा देणाऱ्या काही मौलिक भावनांचे नुकसान हे त्यांच्या दृष्टीने फार महत्त्वाचे होते. त्याचे वर्णन त्यांनी कसे केले ते पहा —

*'ह्या घरात गेले नांदुनी वाडवडील*
*ज्यांनी न होऊनी दिले कलंकित शील*
*त्या घरात नांदत होते पूर्वज जे जे*
*ते ठेवत होते नित्य खुले दरवाजे*
*केव्हाही त्या घरी आल्यागेल्या साठी । आदरे वाढली गेली डाळ नि रोटी*

*त्या घरातील रांजण आणि कणंग । भागवीत होती गावकऱ्यांची गरज*
*दिलदारपणाची श्रीमंती गडगंज*
*कधी कधी जुनेरे नेसुनि एकच एक*
*त्या घरात आई शिकवूनि गेली नेक*
*घर नव्हते केवळ खांबांचे तुळयांचे ;*
*ते नव्हते केवळ विटा दगड कौलांचे*
*ते निशाण होते प्रामाणिकपणाचे । ते निधान होते पुण्यश्लोक कुळाचे*
*ते प्रतीक होते चारित्र्यदि गुणांचे । ते अबोल होते व्यासपीठ धर्माचे*
*जाळून टाकिले तुम्ही न हो घरदार। लाविलात माणुसकीस तुम्ही अंगार'*

अशी ही भावनेला भिडणारी सुंदर कविता, एक वेगळाच दृष्टीकोन यातून कवीने व्यक्त केला आहे.

'कोरा कागद' या विषयावरील एक कविता यशवंतांनी लिहिली आहे. या कवितेवरून कवीचा ओढा सुसंस्कृतीकडे,मंगलतेकडे आहे हे स्पष्ट होते. हा कोरा कागद तुमच्यापुढे ठेवला आहे. यावर काहीही लिहा पण जे लिहाल ते मंगल, चांगले, कलात्मक असू द्या ज्यामुळे सर्वांना आनंद मिळेल. मात्र हे जमणार नसेल तर आहे हा 'कोरा कागद' तसाच कोरा राहू द्या ही कवीची इच्छा आहे. कवी म्हणतो —

*'हा कोरा कागद आहे तुमच्या पुढती*
*ऐशीच उमटवा पदे त्याचिया वरती*
*की गंध फुलादिक लावुनिया उपचार*
*होईल तयाची देव्हाऱ्यामधि वसती*
*हा कोरा कागद सौंदर्याची मूर्ती*
*हा कोरा कागद मांगल्याची वसती*
*हा कोरा कागद सत्याचेच निशाण*
*द्या तयाप्रती हो एकमेव ही महती*
*मात्र हे जमणार नसेल तर —*
*ना तरी राहु द्या कोरा आहे तैसा*
*सन्मान तयाचा त्यातचि होई पुरेसा*
*पांढऱ्यावरी त्या काळे करण्याहून*
*हे कोरेपणही होईल त्याला भूषण'*

अशा तऱ्हेच्या वेगवेगळ्या कवितांमधून कवि यशवंतांनी आपले विचारच व्यक्त केले आहेत. साठ वर्षे पूर्ण झाली की त्या व्यक्तीचा थाटामाटात सत्कार केला जातो. कवीच्या मते खरोखर असे सोहळे आवश्यक आहेत का? ही प्रसिद्धीची टिमकी वाजवायला हवीच का? कवी सवाल करतो —

*'पोषाखी असली हवीत तरी का प्रात्याक्षिके? ढोलकी?*



अनुक्रमणिका

*लोकांना पटवाया गुण, हवे फुंकाव्या शिंग का?*
*वाजंत्री नसता केले न जगता कस्तुरिका मोद का?*
*सोने चोख निखालस, तया का अर्गजा गर्गजा*
*हे वैफल्य न का? पराभव न का वीरा गुणाढ्या तुझा*
*आत्मप्रत्ययहीन, अंध, बहिरे जे भोवताली कुणी*
*त्या अंधा, बधिरा कळे महती का उत्सवा वाचुनी?'*

यातून कवी यशवंत अशा सत्कार सोहळ्याच्या विरुद्ध होते हेच स्पष्ट होते. तसेच खरे मोठेपण कशात याबद्दल यशवंत म्हणतात —

*'सरळ उंच तरू। वये वडिल सुरु*
*डौल मिरवी जरि उद्यानी*
*कोण तया परि वाखाणी?*
*नाही भपका बांधा ठुसका*
*सेव्य वंद्य परि तुळस अंजनी*
*आमुलाग्र ही गुण खाणी'*

खरे मोठेपण भपक्यात, नखऱ्यात नसून समाज हितकर अशा गुणात आहे हा विचार यातून प्रगट होतो.

तसेच वास्तव वास्तव म्हणून नव्या उमेदीने काही करायचे का थांबवायचे. त्याबद्दल कवी विचारतो की —

*'वास्तवतेचा कशास मजला आठव देसी तरी*
*रिंगण सोडुनि, ढग उल्लंघुनी जाऊ नये का वरी*
*वास्तवतेला स्मरणे म्हणजे रीत खितपणे नव्हे*
*नभात घेरे झेप तियेच्या साखळ दंडासवे*
*फुटेल नौका फुटो बिचारी, हातहि मारीत पुढे*
*जायची मज धमक, विदारुनि लाटांचे बुडबुडे*
*तुलाही नेईन सवे माझिया भुजात बळ जोवरी*
*ते सरले तर नच डगमगता सवे बुडू सागरी'*

नवे काही करण्याची उमेद, जिद्द यातुन व्यक्त होते.

श्रीमंत आणि गरीब यांच्या संबंधी लिहिताना कवीचे म्हणणे असे की जे मुळातच गरीब आहेत त्यांना कसली भीती. उलट जे खाऊन पिऊन गबर आहेत त्यांनाच सतत भीतीचा रोग जडलेला असतो कवी म्हणतो —

*'भुकेची एवढी भीती कुणाला घालिता राव*
*न भीती त्याजला ज्याच्या श्रमा ये वाजवी भाव*
*पदे सांभाळणे कैसी, भये ही ऐदखावूंना*
*स्वतःच्या ताजव्याने का अहो ह्या तोलता दीना*

*कमाईनेच कष्टाच्या झिजे ज्याचा स्वयंपाक*
*उद्याची सोय अन्नाची न घाली त्याजला घाव'*

यात वर्णन केलेली परिस्थिती सत्यच आहे. जास्त काळजी फार श्रीमंत, ऐतखाऊ वर्गातच असते हे आपल्याला नेहमीच प्रत्ययाला येते.

'तनाशा' या कवितेत बेगडी रूपाला मान मिळतो नि सत्याला मात्र तुरुंगवास हा अनुभव सांगताना कवी लिहितो —

*'मिळाव्या स्वाभिमानाच्या सदा शीर्षावरी लाथा*
*करी जो सारखी हांजी तया तख्तापुढे थारा'*

अशा तऱ्हेचा अनुभव सर्वांनाच नेहमी येत असतो. एक प्रकारे समाजवृत्तीचे दर्शनच अशा कवितांमधून कवी घडवितो. असाच एक समाजवृत्तीचा अनुभव आपणास 'कोणाचे आम्ही कोण' या कवितेत त्यांनी मांडलेला आहे.

*'कुणीकुणाचे नाही*
*साधाया केवळ स्वार्थ । देति हात हाती आप्त*
*आप्तांचे अमुचे सैन्य । वाढविते अमुचे दैन्य*
*मित्रांची अमुची फौज । मग बघते दुरुनी मौज*
*आम्हाला जगण्यासाठी । वाव कुठे पृथ्वी पाठी*
*आप्त गोत व्हाया अमुचे । हृदय रक्त ना ऐकाचे '*

तसेच —

*'आम्हाला मानुनी चोर । चोरांना गणती थोर*
*परक्यावर कौतुक वृष्टी । तुच्छताच आम्हावरती*
*परक्यांना मलिदा देती । परि कळणा अमुच्या पात्री*
*पापास्तव दोषी आम्ही । पुण्य घेति अपुल्या कामी*
*विपदेला मालक आम्ही । धन धान्या परि ते स्वामी '*

अशी ही समाज प्रवृत्ती. तुम्हा आम्हा सर्वांच्या अनुभवाची.
आणखी एके ठिकाणी याच प्रवृत्तीबद्दल ते लिहितात —

*'रक्त आटवाने ज्यास्तव त्यास ना फिकीर*
*न्यून वर्म परि आढळता, सोडितात तीर*
*त्वचा सोलण्याला सजती मिळावया गीर*
*सदा स्वार्थ संगीतास्तव पिळती जीव तारा*
*घरी आणि दारी भरला घोर तिमिर सारा '*

अशातऱ्हेचा अनुभवही आपणा सर्वांना अधून मधून येतच असतो.

कवी यशवंतांनी स्वातंत्र्यपूर्व काळही अनुभवला होता. त्या काळातील स्वातंत्र्य लढ्याने जनतेत पारतंत्र्यावद्दल, गुलामगिरीबद्दल, चीड निर्माण झाली होती. अशा परिस्थितीत कवी मंडळी स्वस्थ बसणे शक्यच नव्हते.कवी यशवंतांच्या स्वातंत्र्याबद्दलच्या कविता अतिशय



अनुक्रमणिका

प्रभावी व प्रेरणादायक आहेत. 'स्वातंत्र्य देवीस मुजरा' ही अतिशय भक्तिभावनेने लिहिलेली प्रेरणादायक कविता. 'देहाचा पूल' या कवितेला इतिहासाची पार्श्वभूमी आहे. विजापूरचा मुसलमान शिवाजीवर चाल करण्यासाठी येत आहे ही बातमी शिवाजी महाराजांना कळताच ते ३०० मावळे घेऊन मुसलमानावर तुटुन पडण्यासाठी निघाले. खानाला ही बातमी समजली. त्याने स्वसंरक्षणार्थ छावणी भोवती खंदक खणून त्यात लाकडे पेटवून ठेवली. परंतु शिवाजीच्या मावळ्यामधील चार धाडसीवीर त्या खंदकावर आडवे झोपले व त्यांच्या देहावरून इतर सर्व मावळे छावणीकडे गेले. केवढी ही राष्ट्रभक्ती. या शौर्याची, त्यागाची, देशभक्तीची थोरवी कवी यशवंतांनी या कवितेत फार प्रभावीपणे केली आहे.

*'ते मावळे कसे होते तर —*
*ते स्वदेश कल्याणार्थ*
*लाथाडुनि देती स्वार्थ*
*मानुनी समर शुचितीर्थ*
*शौर्याची करिती शर्थ*
*जणु कुरुक्षेत्री तो पार्थ*
*असे वीर, की जे —*
*ते बच्चे नच भ्याडांचे*
*ते मराठेच हाडाचे*
*ते भोक्ते स्वातंत्र्याचे*
*सह्यगिरी कुहरातिल*
*ते छावे शार्दुलाचे'*

अखेर त्यागाची, राष्ट्र भक्तीची गौरवगाथा गातांना कवी यशवंत म्हणतात —

*'इतिहास आज हा श्रवता*
*वाटेल खंत जरि चित्ता*
*तरि मनन करावे आता*
*का स्वराज्य तेव्हा झाले*
*का स्वराज्य सांप्रत गेले'*

अशी ही इतिहासावर आधारलेली कविता त्याकाळी स्वातंत्र्य सैनिकांना, प्रत्येक देशभक्ताला स्फूर्ती देणारी.

'तुरुंगाच्या दारात' ही कविता पण अशीच स्फूर्तिदायक. या कवितेतील शब्दांमधला आवेश, यातील कल्पना यामुळे ही कविता वीरश्रीयुक्त असून चैतन्य निर्माण करणारी आहे.

*'वाढु दे कारागृहाच्या भिंतीची उंची किती*
*मन्मना नाही क्षिती*
*भिंतीच्या उंचीत आत्मा राहतो का कोंडुनी*
*मुक्त तो रात्रंदिनी'*

अशी ही सुरुवातच किती परिणामकारक आहे. याच कवितेच्या शेवटी कवी म्हणतो —

*'शृंखला पायात माझ्या चालताना रुमझुमे*
*घोष मंत्राचा घुमे*
*लौकरी स्वातंत्र्यभानो भारती दे दर्शन*
*होई तेव्हा पावन'*

अशी इष्ट भावना व्यक्त केली आहे.

'वंदन तुज मायभूमी हे अखेरचे' ही तर खूपच लोकप्रिय झालेली कविता. या कवितेत मातृभूमीला उद्देशून व्यक्त केलेली खंत सांगताना कवी म्हणतो —

*'ग्रीष्माचा दाह काय वाळल्या तृणा*
*राखेला जाळिल का अग्नि तो पुन्हा*
*परि तुझी न भेट मला व्हायची पुढे*
*ह्या शल्ये हे तुटते मात्र आतडे*
*मिळणार न अन्य शयन गे त्वद्‌डिचे*
*वंदन तुज मायभूमी हे अखेरचे'*

अशी ही भावनोत्कट नि परिणामकारक कविता.

'अजिंक्य भारतखंड' ही सुद्धा देशभक्तीपर कविता आहे.

कवी यशवंतांच्या देशभक्तीपर कविता जागृती करण्याच्या दृष्टीने उपयुक्त ठरल्या. पारतंत्र्य काळात अनेक कवींनी अशा देशभक्तीपर कविता लिहिल्या. त्यापैकी काही मोजक्याच कविता आजही लोकांना परिचित आहेत. बाकी काळाच्या ओघात कुठे गडप झाल्या कळालेच नाही.

'द्या आम्हाला सुळी' या कवितेतील विचारधारा, दुर्दम्य आशावाद किती प्रभावी आहे हे पुढील ओळी वाचताच लक्षात येईल.

*'द्या आम्हाला सुळी, जाहलो आम्ही तुमचे बळी*
*जगी निरंतर नांदतील परि अमुच्या शाणव कुळी*
*खुडून टाका अम्हास, आम्ही दुर्वांकुर भूतळी*
*पाताळापर्यंत आमुची परंतु रुजली मुळी*
*काय हटवुनी हटतो सागर? हटेल एकीकडे*
*उफाळेल तो दुसरी कडुनी गिळून डोंगरकडे*
*द्या आम्हाला सुळी होऊ द्या कृतार्थ जन्मुनि कुळी*
*पितर मुक्तिच्या मोदे म्हणतिल 'धन्य पुत्र हे बळी'*

याआधी मी कवी यशवंतांनी लिहिलेल्या काही खंडकाव्याचा ओझरता उल्लेख केला आहेच. त्यासंबंधी पुढे असेही म्हटलं आहे की खंडकाव्ये वाचून त्यावर लिहावयाचे ठरविले तर तो एक स्वतंत्र लेखाचा विषय होईल. तरी पण त्यांनी शिवाजीमहाराजांवर लिहिलेल्या खंडकाव्याबद्दल अतिशय थोडक्यात काही लिहिणे आवश्यक वाटते. त्यांच्या या खंडकाव्याचे



अनुक्रमणिका

नाव आहे 'छत्रपती शिवराय'. सुमारे ५२० पानांचा हा ग्रंथ. तो ग्रंथ नुसता चाळला तरी कवी यशवंतांच्या परिश्रमाची आपल्याला कल्पना येते. शिवाजी महाराजांच्या संपूर्ण जीवनाचे, चातुर्याचे, पराक्रमाचे, मुत्सदी डावपेचांचे कौशल्य लक्षात घेऊन, हे जीवन काव्यबद्ध करणे खरोखरीच फार मोठे आणि चिकाटीचे काम आहे. पण यशवंतांनी सात-आठ वर्षे यावर कसोशीने अभ्यास करून हे खंडकाव्य लेखनाचे कार्य पुरे केले आहे. त्यासाठी त्यांनी घेतलेली मेहनत व सखोल अभ्यास यासंबंधीची कल्पना आपल्याला त्यांनी लिहिलेल्या त्यांच्या प्रस्तावनेतून येते.

खंडकाव्याच्या क्षेत्रात कवी यशवंतांचे कर्तृत्व खरोखरीच प्रशंसनीय आहे.

हे संपूर्ण काव्य शिवरायाच्या संपूर्ण जीवनाचे तपशीलवार दर्शन घडविणारे व सुसूत्र पद्धतीने लिहिलेले काव्य आहे. त्यासंबंधी काही काळ रविकिरण मंडळात असलेले त्यांचे समकालीन कै. वि. द. घाटे असे म्हणतात — 'यशवंतराव, हे काव्य वाचून मी शुचिर्भूत झालो. 'उदात्तता' हा महाकाव्याचा मी सर्वांत मोठा गुण समजतो. तुमच्या काव्यात तो ओतप्रत आहे. मी शुचिर्भूत झालो.'

बा.सी. मर्ढेकर, खरं म्हणजे, नवकाव्याचे जनक. तरीही तेही यशवंतांना म्हणाले — 'कविवर्य, खंडकाव्य लिहिणे केवळ तुम्हालाच जमू शकेल.'

यशवंतराव चव्हाणांनी तर कवी यशवंतांना या काव्याबद्दल मनापासून धन्यवाद दिले.

संपूर्ण खंडकाव्य एकाच 'वृत्तांत न लिहिल्यामुळे व त्यात छंदोबद्धता व विविध जाती वृत्ताचा अवलंब केल्यामुळे वाचकाला वाचताना बरे वाटते. एकाच वृत्तात असते तर वाचन हे कंटाळवाणे झाले असते. कल्पनांचा विलास तर या खंडकाव्यात जागोजागी आढळतो. त्यात पौराणिक घटना, तत्त्वज्ञान, निसर्ग आदिंची अधून मधून पेरणी केलेली दिसते. एकूण संपूर्ण शिवचरित्र काव्य माध्यमातून रसिकांपुढे ठेवण्यात ते यशस्वी झाले आहेत.

बाजीप्रभूने खिंड लढविली व गडावरील तोफांचा आवाज ऐकताच शिवाजीमहाराज गडावर पोचल्याचे बाजीप्रभूंच्या ध्यानात आले. तो मरण स्वीकारताना म्हणतो —

*'पोचलात सुखरुप गडावर धनी । धन्य हे मरण मला !'*

या खंड काव्यात सुरवातीस प्रत्येक गड आपली हकीकत सांगतोय असेही चित्रण आहे. उदाहरणार्थ गड कोंडाणा म्हणतो —

*'मी कोंडाणा, हाच कडा तो इथून चढला वीरगडी ।*<br>
*लाजवीत की घोरपडी । इथे तयाची पहा समाधी ।*<br>
*लावा तिजला कान जरा । तिच्यातला प्रत्येक चिरा ।*<br>
*गड आला पण सिंह गेला ।*<br>
*कण्हतो शोकाकुल गिरा ॥'*

शिवथर घळ-सज्जनगड यातूनही असेच शब्द निघतात —

*'ऐका शब्द न शब्द त्यातला । कोरुनि हृदयावरि ठेवा*<br>
*गनिम निपटुनि काढावा । मराठा तितुका मेळवावा*

-	*अपुला महाराष्ट्र धर्म वाढवावा । देव मस्तकी धरावा*
*अवघा हलकल्लोळ करावा । म-हाटराज्याच जिकडे*
*तिकडे व्हावे, ध्यासचि हा घ्यावा ॥'*

त्या काळात परिस्थिती दारुण होती. सर्वत्र अंदाधुंदी, लोकांचे हाल व मनात दाटलेली भीती, यासंबंधीचे वर्णन यशवंत खालील प्रमाणे करतात —

*'केव्हा फौजेची येईल धाड । खडखडेल केव्हा कवाड*
*दूध दुभते दाणा वैरण । केव्हा नेतील बळे घुसून*
*घाला पडेल अब्रूवरती । भये झोपना दिवसारात्री'*

शहाजी जिजाई लग्न सोहळ्याचे वर्णनही असेच सुरेख आहे. मंडप सजविला आहे इतकंच नव्हे तर —

*'॥ धुळीस दावावया घातले सडे केशराचे*
*कुखंडीमधि तेवु लागले दिवे अत्तराचे ॥'*

जिजाईला, या निजाम शाहीची भीती वाटे. ती भीती दूर करण्यासाठी शहाजीने तिला समजावले. परिणामी —

'द्यावया धीर जे यापरी वदले राजे । ते बोल तयांचे गमले तिज कारंजे
ज्यामधून आत्मविश्वास पतीचा उसळे । ज्यामुळे भीतीचे धुके सतीचे वितळे
तैं स्वामींच्या लपवून कुशीमधि वदना जाहली जिजाऊ सुजाग निद्राधीन'

गुणवंतांना मान मिळतोच, हे सांगताना कवि म्हणतो —

*'गुणवंता पुढती विनम्र होतो माथा*
*ना जातपात वय विचार शिवतो चित्ता*
*पाहिजे परंतु त्यासाठी दिलदारी*
*दिलदारी असते दुर्मिळ परि दरबारी'*

याउलट —

*'बदनाम करु पाहतात खल गुणवंता*
*पिकवूनी तयाच्या नावावरती अमृता'*

असेही घडते.

शिवरायाच्या जन्म झाला त्यासंबंधात कवी लिहितो —

*'शुक्राचा तारा उगवला शुक्राचा तारा*
*कुठे? नभी? छे हो जन्मला जिजाइच्या उदरा'*

तर शिवाजीबद्दल भविष्यकार भाष्य करताना —

*'कुणी असो मोठा कितीही, असोही सम्राट*
*ठेविल हा आपुली त्यापुढे मान सदा ताठ*
*पराक्रमाने हो आपुल्या जिंकुनिया पृथ्वी*
*संपादिल महामति हा सार्वभौम पदवी'*



अनुक्रमणिका

अशा रीतीने हे दीर्घ खंडकाव्य नटलेले आहे. रसिकांनी ते शांतपणे वाचले तरच त्याचा खराखुरा आस्वाद त्यांना घेता येईल. सविस्तर लिहावयाचे म्हटले तर दीर्घ असा वेगळा लेखच होईल.

असे हे कवी यशवंतांच्या काव्याचे धावते दर्शन.

यशवंतांनी विपुल कविता लिहिली तशीच ती समाजमनाला भिडणारी होती. त्यांच्या कवितेतील ओघवतेपणा, सहजसुंदरता, सोपेपणा, कल्पनांचा वेगळेपणा, विषयांची विविधता, शब्द संपत्तीची विपुलता हे सर्व पाहिले म्हणजे कवि यशवंतांचे संपूर्ण आयुष्य हेच मुळी महान खंडकाव्य होते असे म्हटल्यास ते मुळीच अतिशयोक्तीचे ठरणार नाही.

□

म. पां. भावे

४६, आनंदाश्रम कॉलनी, शिवाजीनगर,

नौपाडा, ठाणे ४०० ६०२.

---

## स्वागत

- **फन वीथ मॅच बॉक्स** : रेखा माणगावकर, सतिश देशपांडे, राजहंस प्रकाशन, पुणे
- **वाचिक अभिनय :** श्रीराम लागू, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे ९६,
- **एड्सचा भोवरा :** डॉ. आनंद जोशी, श्रीराम सिधये, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे १२८
- **नाझी भस्मासुराचा उदयास्त :** वि. ग. कानिटकर, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे ५८१
- **सोनियाची दिन :** गोविंद कुलकर्णी, निर्मल प्रकाशन, नांदेड, पृष्ठे ८०
- **केवळ तुमच्यासाठी :** व्यं. नां. वळसंगकर, रजत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १२८

**साकेत प्रकाशन, औरंगाबाद यांची प्रकाशने**

- **भारताचे स्वातंत्र्य :** भा. ल. भोळे, पृष्ठे ५३
- **डॉ. आंबेडकर, अनुभव व आठवणी :** भा. ल. भोळे, पृष्ठे १०८
- **देवधर्माच्या नावानं :** ज्ञानेश महाराज, पृष्ठे २५६
- **नाती कथा** : बाबा भांड, पृष्ठे १६०
- **व्यवस्थापन** : डॉ. प्र. चिं. शेजवलकर, प्रकाशक लेखक स्वत:, पृष्ठे २००

**उत्कर्ष प्रकाशन, पुणे यांची प्रकाशने**

- **मी रंगवलेले म्हातारे :** शरद तळवलकर, पृष्ठे १२७
- **सतीचा वाडा :** शांता शेळके, पृष्ठे १२५
- **अ-लौकिक :** शांता शेळके, पृष्ठे १३२
- **गोंधळ :** रा. रं. बोराडे, पृष्ठे १६०
- **अक्षरभेट :** विद्याधर द. दांडेकर, प्रकाशक कवी स्वत:, पृष्ठे ५८
- **चंदर :** वी. एम. लोणकर, सौरभ प्रकाशन, पुणे ५१, पृष्ठे ८६
- **प्रकाशकनामा :** मधुकाका कुलकर्णी, श्री विद्या प्रकाशन, पृष्ठे २३४

## स्वागत

- **आदिवासी विकासातील दीपस्तंभ** : डॉ. गोविंद गारे, श्री विद्या प्रकाशन, पृष्ठे २७७
- **चौफेर** : माधव गडकरी, श्री विद्या प्रकाशन, पृष्ठे २५८
- **म. गांधी काँग्रेस भारताची फाळणी** : रा. सो. सराफ, श्री विद्या प्रकाशन, पृष्ठे १४२
- **मन शुद्ध तुझे** : चंद्रकांत राऊ, मायबोली प्रकाशन, पृष्ठे १५७
- **आमचे विनोबा** : राम शेवाळकर, मानसन्मान प्रकाशन, पुणे, पृष्ठे २९५
- **अनंतरंग** : अनंत वर्तक, मानसन्मान प्रकाशन, पुणे, पृष्ठे १३५
- **चिरंजीव सप्रक** : ज्योत्स्ना देवधर, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे ४०
- **नाट्यमन्वंतर** : डॉ. कमलेश, समर्थ प्रकाशन, पुणे, पृष्ठे १४६
- **वलयांकित** : भा. गं. शेटे, रोझ प्रकाशन, पुणे, पृष्ठे १९०
- **माझ्या आभाळाची गोष्ट** : डॉ. प्रदीप आवटे, साहित्य कलायात्री, पुणे, पृष्ठे १०४
- **प्रतिष्ठा** : बजरंग होणार, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे २१५
- **समरकथा स्वातंत्र्याची - भाग १ ते ४** : राजा मंगळवेढेकर, उत्कर्ष प्रकाशन, पृष्ठे ७२
- **सांगे दास कबीर** : विष्णुकांत जडे, प्रा. बि. ए. पटेल, जळगांव, पृष्ठे ७०
- **रंग दोन** : कमल देसाई, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १९१
- **थोर चित्रकार भाग १** : प्र. न. जोशी, कर्मवीर प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३८
- **थोर चित्रकार भाग २** : प्र. न. जोशी, कर्मवीर प्रकाशन, पुणे, पृष्ठे ४०
- **थोर चित्रकार भाग ३** : प्र. न. जोशी, कर्मवीर प्रकाशन, पुणे, पृष्ठे ४०
- **थोर चित्रकार भाग ४** : प्र. न. जोशी, कर्मवीर प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३२
- **भारतीय संत भाग २** : प्र. न. जोशी, शिव प्रकाशन, पृष्ठे ६४
- **भारतीय संत भाग ३** : प्र. न. जोशी, शिव प्रकाशन, पृष्ठे ६४
- **भारतीय संत भाग ४** : प्र. न. जोशी, शिव प्रकाशन, पृष्ठे ६४
- **दासबोध** : डॉ. उमेश तेंडुलकर, स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठे २७२
- **मराठी वाङ्मय सद्यस्थिती** : डॉ. विद्यागौरी टिळक व डॉ. द. दि. पुंडे, स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे : पृष्ठे १३२
- **विजेची कोर** : डॉ. विजया संगवई, स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठे ५२
- **असे खेळ असे खेळाडू** : निरंजन घाटे, स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठे ६४
- **देहपरिचय** : ज्ञानप्रबोधिनी लेखक, नवनगर विद्यालय, शिव पब्लिकेशन, पुणे, पृष्ठे ६४
- **बिंग** : ह. शि. खरात, डिंपल पब्लिकेशन, मुंबई, पृष्ठे ६८
- **यक्षगान** : वि. भा. देशपांडे, नवीन प्रकाशन, पृष्ठे ८६
- **रंगहोळी** : अनिल धाकू कांबळी, वैजयंती प्रकाशन, सावंतवाडी, पृष्ठे १०१
- **विदेश** : अमृत मेहता, कृष्णा पब्लिशर्स, पृष्ठे २३७
- **लक्ष्मणरेषा** : अशोक जैन, राजहंस प्रकाशन, पृष्ठे १८७
- **अमेरिकेत शिकायचंय** : अरविंद गोखले, राजहंस प्रकाशन, पृष्ठे १७४

# शोध महात्मा गांधींचा : अरुण सारथी

श्री. म. जोशी

माझ्यासमोर श्री. अरुण सारथी ह्यांनी लिहिलेल्या द्विखंडात्मक ग्रंथाचा शोध घेण्याचा प्रामुख्यानें विचार आहे. विचार आहे ह्या 'ग्रंथाचाच शोध' घेण्याचा.

ह्यापूर्वीही त्यांची महाराष्ट्राची शोकांतिका, भारतीय लोकशाही, शोध आधुनिक भारताचा वगैरे पुस्तके मी वाचलेली आहेत. त्यांतील बुध्दिवादी विचारसरणी व एक प्रकारची तटस्थता ह्यामुळे मला ती वेगळीच वाटली. एवढे नव्हे तर ती आवडलीही. त्यांचा हा नवा ग्रंथ हे त्यापुढचेच पाऊल आहे.

गेल्या पाच एक वर्षात (महात्माजींच्या १२५ व्या जयंतीपासून साधारणतः) पुन्हा 'महात्माजी' ह्या विषयाला एक चांगले उधाण आले आहे. आणि ह्या नावीन्याला केवळ एक चरित्रात्मक असे परिमाण नसून महात्माजींच्या व्यक्तिमत्त्वाचा, राजकारणाचा, मूल्यांचा शोध घेण्याचा शोध असा प्रकार प्राप्त झाला आहे. विशेष म्हणजे त्यांचे वैयक्तिक, कौटुंबिक असे जीवनही त्यातून सुटलेले नाही. आणि केवळ लिखित साहित्य कृतीपुरतीच मर्यादा न राहता आता दृश्य स्वरूपांत नाटकेही येऊ लागली आहेत. गांधी विरुध्द गांधी, गांधी व आंबेडकर आणि अलिकडचे अगदी वादग्रस्त आणि बंदी आलेले 'मी नथुराम बोलतो आहे' हेही. ह्या शेवटच्या नाटकाची तर एक गंमतच आहे-ज्यांनी त्याची संहिताही वाचली नसेल,






श्रवणही केले नसेल, पाहिले तर नसेलच त्यांनी गदारोळ उठवून बंदी आणवली आणि न ऐकता, न वाचता, न पाहता सत्ताधाऱ्यांनी बंदी घातलीही! (काही पुरोगामी कलावंतांनी सुध्दा हे योग्य नाही असेही सांगितले !) ह्याच काळात एका गांधीवादी शास्त्र्याचे जवळजवळ दीडतास चाललेले दूरदर्शनवरील प्रदीर्घ (आणि रटाळही!) भाष्य व भाषणही ऐकायला मिळालेले-तेही सलग! असो.

नाटक वा कादंबरी ह्यां प्रकारांना त्यामानाने कालाच्या मर्यादा पडतात म्हणजेच काही काळानंतर ते जुने वाटू लागते, पण ग्रंथांना त्यामानाने दीर्घायुष्य लाभते. ग्रंथांचा वेळोवेळी संदर्भ ग्रंथ म्हणूनही उपयोग होऊ लागतो. वाङ्मयप्रकाराच्या ह्या मूल्यांचे महत्त्व अशा साहित्यकृतींमधून पटू लागते. ह्यापूर्वी वराच काळ 'चरित्र' ह्या वाङ्मयप्रकाराने आपण समृध्द झालो, मध्येच चरित्र कहाण्याही येऊन गेल्या. (महात्माजी व त्यांचा मुलगा ह्याबद्दल कादंबरी चरितकहाणी आहेच!) समकालीनांच्या वृत्तपत्रीय लेखांचे महत्त्वही संदर्भ म्हणून कमी नसते. पण नुसत्या अशा प्रकारांपेक्षा आठवणी, आख्यायिका ह्यामुळेही एक वेगळा प्रकाश पडू शकतो. परंतु हा द्विखण्डात्मक 'शोध' मला विशेष वाटला तो प्रा. अरुण सारथींच्या शोध घेण्याच्या नव्या प्रकारानं!

काहींनी महात्माजींच्या चरित्रग्रंथाचे अवलोकन करूनच आपले ग्रंथ सिध्द केले तर प्रा. अरुण सारथींनी त्यांच्याच खुद्द गाजलेल्या 'आत्मकथेला' हात घातला. भरपूर पिंजून काढली. त्यापेक्षाही महात्माजींचे संकल्पित वाङ्मयाचे (जवळ जवळ शंभर खण्ड नशिबाने पुन्हा उपलब्ध आहेत!) खण्डही अभ्यासले. त्यामुळे अगदी तेंडुलकरांच्या सहा खण्डात्मक चरित्राच्या अवगाहनानेही हाती न लागलेले असे बरेचसे प्रा. सारथींच्या हाती लागले.

असे संदर्भसाहित्य नुसते हाती लागून उपयोग नसतो. तर इंग्लिशमध्ये 'टू रिड विटवीन द लाइन्स' म्हणतात. म्हणजे त्यातील दडलेले, उथळपणे बाहेर न आलेले, क्वचित दडवलेले तर कधीकधी टीकाकाराला विकृत करून हनन करण्यास प्रवृत्त करणारे असेही असेल ते टाळून 'शोध घेण्याचे विधायक कौशल्य' प्रा. सारथींच्या लेखणीत आहे हे जाणवते. ह्याचा उगम त्यांच्या पूर्व उल्लेखित ग्रंथातही आहेच. शोधक प्रवृत्ति, शक्यतोवर सहानुभूतिपूर्वक विचार, तोल ढळू न देण्यास आवश्यक असलेली तटस्थता, अलिप्तता, उमगले ते स्पष्ट सांगण्याचे धाडस, तर काही ठिकाणी प्रश्न उपस्थित करून इतरांना प्रोत्साहित करण्याची वृत्ति ह्या वैशिष्ट्यांमुळे ग्रंथाचे स्वरूप वेगळे आहे आणि हेही खरेच की वेळोवेळी लिहिलेल्या पत्रांचा, आत्मगत वृत्तांचा (वा दीर्घ आत्मकथा-आत्मचरित्र) जेवढा एखाद्या व्यक्तीच्या मनाचा तळ पाहण्यास उपयोग होतो तितका चरित्रांचा होत नाही. फक्त तळाशी जाणारी दृष्टी स्वच्छ असावी लागते तशी ती प्रा. सारथी ह्यांची आहे.

(जाता जाता-

संकलित वाङ्मयाचे मोठे असे शंभर खण्ड वाचणे हा सुध्दा खरं तर एक अभ्यास नसून साधना आहे. A Great Divide ह्या ग्रंथाचा 'इंग्लिश' कर्ता Hodson ह्याने फक्त असे उल्लेख केलेले मला आढळले तेव्हा ते खण्ड एक तर खुद्द महात्माजींनी, दुसरे

छपाईसाठी आवश्यक त्या खिळे जुळवणाऱ्याने व तिसरे हॉडसन साहेबानेच वाचले असा गंमतीशीर ग्रह झाला, पण प्रा. सारथींमुळे ह्या खंडांचाही संदर्भ शोधून चिकित्सा करणारा भेटला हाही एक वेगळा वाङ्मयीन आनंद आहे.)

पुन्हा प्रा. सारथी ना गांधीवाद्यांच्या गोतावळ्यातले, ना घणाघाती टीका करणाऱ्या हिंदुत्वनिष्ठांच्या आप्तांमधले. त्यामुळेच विभूतिपूजाही दूर राहिली आणि प्रसंगी आवश्यक वाटणारे पण क्रूर मूर्तिभंजनही टळले. साहजिकच महात्माजींच्या बलस्थानांची कल्पना आली. एकीकडे एकांगीपणाकडे झुकणारे महात्माजी जन्मभर एकच एक कवटाळून बसतात तर दुसरीकडे तेच महात्माजी आपल्या जीवनमूल्यांच्या प्राधान्यतेत धरसोड करताना दिसतात त्या विसंगतीत संगती काय आहे हे थोडेफार जाणता येते.

चरित्रातून घटनाक्रम वा प्रत्यक्ष घटना फारशा बदलता येत नाही. हे असे असे घडले इतकाच त्याचा मतितार्थ आणि त्यापुढचे चिकित्सकांचे काम असते 'का?' हे सांगायचे 'किती - कितपत' हे सांगायचे! सुसंगति लावायची वा विसंगति दाखवायची! काय आहे, त्यामागे हे कशामुळे ह्याचा शोध घेण्याचे हे काम! ते प्रा. सारथींनी यथाशक्य अटीतटीने पार पाडले आहे.

एक बरे आहे की -

प्रा. सारथींनी ठायीठायी मूळ खण्डातील अवतरणेच्या अवतरणे क्वचित दीर्घ दिली आहेत त्यामुळे एक संदर्भ ग्रंथ म्हणूनही ह्याचा उपयोग होऊ शकतो -

**श्रीकृष्ण महादेव जोशी**

*जन्म - २० डिसेंबर १९३०*

*शिक्षण - बी.एस्‌सी. (ऑ) १९५१ - रसायनपदार्थशास्त्र*

*बी. ए. (ऑ) १९५७ - हिंदी-मराठी-इंग्लिश*

*सेवा - दारुगोळ्यांचे कारखाने -खडकी, जबलपूर, चांदा (१९५२-१९८८)*

*लेखन- 'प्रताप' साप्ताहिक, धुळे १९४९-१९५०*

*'भारत' दैनिक पुणे १९५१, 'केसरी' पुणे १९६९-१९७१ (मराठी अभिनेते), 'तरुणभारत' नागपूर १९७३ (मराठी नाट्य-चित्रअभिनेते), 'सोबत' पुणे १९८९-१९९१ (अभिनेते), 'तरुणभारत' पुणे १९८९ (तत्कालिन वैचारिक), 'तरुणभारत' सोलापूर १९९३ (तत्कालिन वैचारिक), 'दै. वार्ताहर' (रविवार आवृत्ती) मुंबई १९९३ (अर्वाचीन भारतीय विचारवंतांचे 'हिंदुत्व' लेखमाला-२५ लेख),*

*'एकता' मासिक, पुणे १९९३-१९९४ (लेखमाला-आणि भारतमाता खण्डित झाली! - १८ लेख), 'एकता' मासिक पुणे १९९८ सुरू (लेखमाला-कर्मयोगी प्रपंच)*

*संपादन — पु. भा. भावे लेखसंग्रह-सावरकर नावांची ज्योत, रुद्रवीणा, ज्वालामुखी, सर्वनाश, घणाघात, माझे टीकालेख, चकाट्या (७) विद्याधर गोखले अग्रलेख व 'लोकसत्ता' 'अष्टपैलू' भाग १ ते ६. विशेष — सावरकरांचे आंतदर्शित्व १९९४ (दक्षिणा पारितोषिक), वाघिणीचे दूध - (प्रबंध) - आगामी (१८७४-१९२५)*

*इतर - ५००० पुस्तकांचा व मासिकांचा संग्रह (बरीच दुर्मिळ)*



अनुक्रमणिका

आणि -

त्यावरच आपले भाष्यही मोजक्या पण ठाम शब्दांत सांगितले आहे- त्यात ठामपणा आहे, आक्रस्ताळेपणा नाही आणि ज्या ठिकाणी आपला शोध अधुरा राहतो असे वाटते त्या ठिकाणी इतरांना प्रसंगी गांधीवाद्यांनाही प्रतिवाद करण्यास सुचवून आपली लोकशाही मनोवृत्ति प्रकट केली आहे.

त्यामुळेच त्यांच्या इतर पूर्वीच्या पुस्तकांमधील विचारांचाच प्रतिध्वनी म्हणजे विधायक, सर्जक प्रवृत्तीची नितांत आवश्यकता सतत पुढे ठेवणे हा उमगला आहे. पुन्हा आपले म्हणणे पटवण्याचा प्रकार प्रचारकी नाही- जणू निकोप संसदीय असाच आहे. साहजिकच आपले म्हणणे दामटण्याचाही प्रश्न नाही. आपले म्हणणे वाचकांना सहज समजावे म्हणून भाषा नुसतीच अनलंकृत अशी नाही तर सोपीही आहे.

पुन्हा

हा 'शोध' थेट कालानुक्रमाने घेतल्याने स्थित्यंतरे वा बदल, व चिकटून बसणे वा अढळपणा, सत्याची सदैव कास अथवा बदलते प्राधान्य आणि मूल्यांची चढउतर लक्षांत येते.

'कुठून निघाले, कुठे पोहोचले' हे कळते.

समकालीनांच्या, व्यक्तींच्या इथे तुलना नाहीत, अनावश्यक संदर्भ नाहीत, त्यांवर ह्या-महात्म्यापायी अन्यायी भूमिका नाही. जितकी पारदर्शकता त्यांनी साधने धुंडताना ठेवली तितकीच पारदर्शकता त्यांनी ग्रंथ सिध्द करतानाही ठेवली आहे.

आता खण्डशः - कालक्रमशः काय आहे ते पाहू!

प्रा. सारथींनी ह्या शोधामागील भूमिका खण्ड १ मधील 'प्रास्ताविक' मध्ये निःसंदिग्ध शव्दांत स्पष्ट केली आहे. केवळ एक 'चूष' म्हणून चिटुकले चरित्रही लिहिणारे कमी नाहीत, वा आवडीपोटी आकाशवाणीवर ह्याच चरित्रमालेचा रतीब घालणारेही आहेत. गांधीवादाच्या आचार्यांची संख्या मला तर वाटतं, इतर प्रांतांच्या मानानं, महाराष्ट्रातच जास्त आणि गांधीवधानंतर गांधीवादाचा पार नक्षा उतरवला तोही महाराष्ट्रातील, गांधी टोपी धारण करणाऱ्यांनीच त्या तुलनेत हे 'प्रास्ताविक' महत्वाचे!

'पंचासंस्कृतीमधून भारताचे पंचतारांकित संस्कृतीमध्ये जे सफाईदार संक्रमण झाले, सामाजिक जबाबदारीची कोणतीही जाणीव नसलेली आणि भ्रष्टाचार, लाचलुचपत, नीतिधैर्य गमावलेली नोकरशाही, भाचेपुतणे वाद आणि असहाय्य जनता ही जी स्वातंत्र्योत्तर भारताची प्रमुख वैशिष्ट्ये, त्यावरून हे स्पष्ट झाले की भारतीय समाजात बुभुक्षितपणा स्वातंत्र्य पूर्वकाळापासूनच असला पाहिजे व तो फक्त संधीची वाट पाहत होता, परंतु आत्मपरीक्षणाचे वावडे असलेले आणि इंग्रजांविरुद्धच्या संघर्षाचे उदात्तीकरण करण्याची सवय लागलेले बहुसंख्य विचारवंत अशा तऱ्हेच्या पुनर्मूल्यांकनास तयार नसतात. उलट स्वातंत्र्यपूर्व व स्वातंत्र्योत्तर काळ अशी, अशा विवेचनाच्या दृष्टीने भारताच्या इतिहासाची असंबध्द विभागणी करून स्वातंत्र्यपूर्व काळातील राजकारण व समाजजीवन मूल्याधिष्ठित होते, तर

स्वातंत्र्योत्तर काळातील राजकारण स्वार्थाधिष्ठित झाले, असे सुलभ विश्लेषण करू लागले. त्यातूनही गांधी या आख्यायिकेला अधिकच उजाळा मिळू लागला. साहजिकच प्रश्न असा येतो की आजच्या समाजजीवनात जे दोष आढळतात, ते नव्याने निर्माण झाले, की भारतीय व्यक्तिमत्त्वाचेच ते दोष आहेत? तसे असतील, तर गांधींना या दोषाचे भान होते का आणि असल्यास त्यांनी ते दूर करण्याचा प्रयत्न केला का? या प्रश्नांचा वेध घेताना गांधींच्या व्यक्तिमत्त्वाचा शोध अपरिहार्य वाटला. प्रस्तुत लिखाण हे त्याचेच फळ होय.' (खण्ड १ पृ.१९)

मला वाटतं समजा जरी प्रा. सारथींचा हा ग्रंथ एखादेवेळी अवेळी टीकेचा विषय झाला तरी त्यांच्या ह्या शोधामुळे भारतीय जीवनाचा व मूल्यांचा शोध व्यक्तिमत्त्वातून घेण्याचा एक प्रामाणिक व ससंदर्भ समर्थ प्रयत्न तर ठरेल, आणि, त्यातूनच ह्या शतकभराच्या कालखण्डावर पडलेली महात्माजींची सावली ह्या शतकाच्या अंती राहील तरी का? ह्याचे उत्तर शोधता येईल. कदाचित 'राष्ट्रपिता' गांधी विसरले जातील, आणि 'महात्मा' गांधींचा उदोउदो होईल. कदाचित नव्या शतकात गांधीवादाच्या विरोधातील चंगळवाद उसळेल आणि गांधींच्या शोकांतिकेची सावली लांबवर पडेल- काय होईल ते पहायचं! पण भारतीय उच्च मूल्यांची घसरण आणि महात्माजींच्या ध्येयवादाची शोकान्तिका ह्यांची सांगड तर कळेल आणि नव्या शतकाला नवे विवेचन, नवा मार्ग सापडेल पण तोपर्यंत 'शोधा म्हणजेच सापडेल' —— थोडे निवडावेही लागेल!

पहिल्या खण्डातील पहिली जवळजवळ १२५-१५० पृष्ठे ही म. गांधींच्या वैयक्तिक जडणघडणीची आहेत. पण त्यातूनच त्यांचा स्वभाव कसा बनला आणि ते पुढच्या जीवनात तो कसा बदलू शकले नाहीत ह्याचा उलगडा आहे.

अविभक्त कुटुंबातील आज्ञापालनाचे शिस्तीचे तत्त्व असतेच. कुटुंबप्रमुख हाच कर्ता. हेच नाते जणू त्या ज्या संस्थेत ते पुढारी म्हणून राहिले त्या त्या संस्थेत बठवले. तसेच घराबाहेरच्या जीवनाबद्दल धास्ती असणाऱ्या मुलाची जी वैशिष्ट्ये असतात ती सर्व गांधींच्या ठिकाणी आढळून येतात. असे मूल ज्याच्या आधीन असते त्याच्या करिष्म्याखाली किंवा प्रतिकूल परिस्थितीच्या दबावाखालीच काही वेगळे करून जाते. अशाबद्दल आत्मकथेतील भरपूर अवतरणे लेखकाने दिली आहेत. (शक्यतो अशा अवतरणांचा वा लेखकाच्या मूळ विधानांचा उल्लेख जसाच्या तसा न करता विचार मी मांडत आहे.)

पुढे त्यांच्या कुटुंबापैकी कुणालाही न रुचणाऱ्या एका मुसलमान मित्राची मैत्री-शेख मेहताबच्या मैत्रीचा उल्लेख आहे. स्वत: गांधीजीच 'दुसरी (ही) मैत्री हे माझ्या आयुष्यातील एक दु:खद प्रकरण आहे. ती मैत्री करण्यामध्ये माझी दृष्टी त्या मित्राला सुधारण्याची होती. 'आत्मकथा (पृ. ११)

'परंतु त्या मित्राला सुधारण्याऐवजी गांधीच नादावले. पण तरीही त्यांनी त्याची मैत्री सोडली नाही.' याचा अर्थ असा की त्याच्याशी मैत्री करण्यामागे अन्य हेतू असावा. (पृ. ७०) हाच मित्र त्यांना वेश्येकडे फक्त 'गुजगोष्टी' करण्यासाठी घेऊन जातो. ह्या साऱ्या

प्रकरणात अत्यंत सूचकतेने लिहून लेखकाने चारित्र्यहनन होऊ न देण्याचे कौशल्यच दाखवले आहे. आणि गांधींच्या आयुष्यात असे प्रसंग स्त्रीसहवासाचे म्हणा वा स्खलनाचे येतच गेले आहेत. पित्याच्या मृत्युप्रसंगी ते पत्नीच्या शयनमंदिरात असतात. प्रार्थनेसाठी देवमंदिरात देवघराजवळ नसतात.(पृ.८४) विलायतेत कुलीन घरामध्ये पत्ते खेळण्यासाठी गेलेल्या गांधीचाही तोल जावा असा प्रसंग ओढवतो. त्यापूर्वीही एका श्रीमंत प्रौढ विधवेशी त्यांनी ब्रयटन येथे संबंध जुळवलाच होता. (पृ.१११-११३) त्यांना परमेश्वर अशा वेळी वाचवतो म्हणे. आणि इथेच लेखकाने त्यांच्या नेतृत्वाचा दुवा विलक्षण रीतीने पुढे ठेवला आहे.—

'गांधींनी आत्मकथा लिहिली ती त्यांच्या राजकीय विजनवासात (१९४५), पण राजकीय पुनर्वसनाची चाहूल लागल्यानंतर साहजिकच ईश्वर आपला सहाय्यकारी आहे अशा तऱ्हेची प्रतिमा, एखाद्या प्रेषिताप्रमाणे, जनमानसात निर्माण करण्याची गरज त्यांना वाटू लागली असणार. राजकीय शिक्षणाबद्दल आग्रह धरणाऱ्या पुढाऱ्यांपेक्षा, ईश्वराचा वरदहस्त आहे असा विश्वास बाळगता येईल, असा नेताच भारतीय मनाला जास्त भावतो. त्यामुळेच अनेक आध्यात्मिक प्रसंगी, वकिली करताना, संस्था चालवताना राजकारणात 'ईश्वराने मला वाचवले आहे' इत्यादि निरुपण आणि उपासनेची महती हे कथनाची गरज नसतानाही आत्मकथेत आले आहे.' (पृ.१११-११२)

अशा स्खलनाचे वा अन्य अध:पतनाकडे नेणारे प्रसंग त्यांच्या जीवनात आणणारा ईश्वरही अजबच म्हटला पाहिजे! असे उद्रेग स्त्रीसहवासाची आवड, आईजवळ घेतलेली शपथ (१०३), स्त्रीसंग टाळण्याची प्रतिज्ञा पण स्त्रीसहवासाने बाधा नाही (१०५), कामावरील विजय तपासण्यासाठी स्त्रीचा उपयोग (पृ. १२२), आफ्रिकेत पुन्हा जाताना कप्तानासकट वेश्येकडे जाणे (पृ.१३८) ते थेट बहुचर्चित असे १९३८ चे स्खलन व नौखाली दौऱ्यास ऐन जातीय वणव्याच्या काळातील त्यांचे ब्रह्मचर्याचे प्रयोग (खंड २, पृ. ५११).

ह्या साऱ्याच गोष्टी त्यांची वेळोवेळी कामवासना दडपून ठेवायची इच्छा तर वासनेची तेतकीच ऊर्मी ह्यातील एक वेगळेच लक्ष दाखवतात. एकबाणी, एकवचनी, एकपत्नी रामाचा आदर्श ज्यांनी पुढे ठेवला त्यांनी कस्तुरबाला १९०८ साली (जवळजवळ लग्नानंतर वीसपंचवीस वर्षांनी) - 'मी तुला खात्री देऊन सांगतो, की जर तुझे जाणे घडलेच, तर तुझ्यामागे मी दुसरे लग्न करणार नाही.' असे लिहिले आहे. दोघांनीं मिळून ब्रह्मचर्याचे व्रत घेतले त्यालाही पाचसात वर्षे लोटूनही हा विश्वास नसावा, (पृ.२३३) ह्यावर लेखकाने मार्गरिट सेंगर यांची काढलेली साक्ष व कोस्लरने दिलेले अवतरण वापरले असून — 'आपले मन खुले आहे असा दावा ते करीत असले तरी आपली मते न बदलण्याबद्दल त्यांना अभिमान होता' (पृ. ८१) आणि लेखक पुढे संगति लावतात —

'वैवाहिक शरीरसंबंधात त्यांची भूमिका आक्रमकाची होती. त्या अनुभवावरून त्यांनी आपली मते निश्चित केली. आक्रमण म्हटले की संघर्ष आला आणि संघर्षात दुसऱ्या पक्षाला पराभूत करणे आले. क्षमता त्यासाठी वाढवणे आले. मांसाहार आणि लैंगिक क्षमता यांचे समीकरण केले जाते..... मेहताबच्या सतत केलेल्या युक्तिवादाला ते बळी पडले, असे ते

लिहितात.' (पृ. ८१)

'ह्या शरीरसंबंधाला एक वेगळा स्तर होता. त्यांना कोणताही छंद नव्हता. खेळ, वाचन, संगीत, चित्रकला, गप्पाष्टके असे छंद असले तर माणसाला कंटाळवाणेपणापासून किंवा ताणतणावाच्या परिस्थितीत विरंगुळा मिळतो. साहजिकच शरीरसंबंध एवढा एकच विरंगुळा त्यांना होता.' (पृ. ८३)

छंद नाही, अवांतर वाचन नाही, शाळेत हुशारी नाही असा मनुष्य इथल्या सरंजामी वातावरणातील हुद्याची जागा घ्यायच्या स्पर्धेत टिकणार कसा? म्हणून त्यांनी बॅरिस्टरीकडे धाव घेतली. तिकडे आपादमस्तक विलायती पेहराव, नृत्य, ते जमेना पुढे वाद्य (व्हायोलिन), असे प्रकार हाताळले, यश टप्प्यात नव्हतेच. बरं वक्तृत्व ही तर वकीलाची महत्त्वाची कला तीही साधेना असा हा बॅरिस्टर होऊनही मुंबईत टिकणार कसा? पुन्हा इंग्लंडात मांसाहार, मद्यपान प्रतिज्ञेमुळे दूरच ठेवावे लागले. साहजिकच अन्नाहाराचे प्रयोग सुरू झाले. त्याचे शास्त्र बनवले. आणि ह्या शास्त्र बनवण्याचीच एक सवय जडून गेली —

'सत्य, अहिंसा, ब्रह्मचर्य आदि भारतीय विचारधारेतील तत्त्वांना त्यांनी शास्त्रबध्द खूण देण्याचा प्रयत्न केला आणि त्या शास्त्राचे ते उद्‌गाते बनले. तसेच त्यांच्या आर्थिक, सामाजिक, राजकीय विचारांनाही शास्त्रीय चौकटीत बसवण्याचा प्रयत्न केला.

कोणतेही तत्त्व शास्त्राच्या पायावर उभे करता येते, या ज्ञानामुळे तर गांधींची उमज आणि बौध्दिक आवाका केवढा तरी विस्तृत व्हावयास हवा होता. पण गांधींनी 'स्वत्त्वा'च्या मर्यादेतच प्रत्येक तत्वाचा आणि संकल्पनेचा विचार केल्यामुळे त्यांनी केलेले निदान आणि काढलेले निष्कर्ष विलक्षण आत्मनिष्ठ (subjective) बनले आणि त्या प्रमाणात त्यांची विश्वसनीयता नष्ट झाली, हा गांधींच्या विचारपध्दतीतील जीवघेणा दोष.... त्यांच्या अनुयायांच्या बाबतीत त्यांच्या शास्त्राचे स्वरूप अंधानुकरणात परिणत झाले. गांधींच्या महात्म्याने भारतीय भारले गेले, पण भारतीय व्यक्तिमत्त्वात कोणताही बदल घडून आला नाही.' (पृ.११८)

त्यांच्या 'स्वत्त्व'पूर्ण अपयशाची बीजे अशी उलगडून दाखवताना प्रा. सारथी ह्यांचे विश्लेषण स्पष्ट होते.

बरं महात्माजींच्या मानसिक कक्षाही विलायतेत कधीच रुंदावलेल्या दिसत नाहीत, युरोप सहलीतही कवाडे उघडली जात नाहीत — त्यांना तिथल्या भव्य ग्रंथालयांचा उपयोगच नाही, तिथल्या राजसत्तेचे चिन्ह असलेल्या पार्लमेंटचे दर्शनसुद्धा घ्यायची इच्छा नाही. (तरीही मांसाहाराद्वारे स्वराज्यासाठी बलोपासना असे मत हा अवघा १४ वर्षांचा मुलगा मांडत होता हं!), कुठे सभांमध्ये वक्तृत्व दाखवलेले नाही, पॅरिसला भेट देऊनही फ्रेंच राज्यक्रांतीसारख्या विषयाबद्दल औत्सुक्य नाही, युरोपबद्दल तर अनभिज्ञता-असे गांधीजी 'स्वत्त्वा'च्या — आपल्या आपल्याच कोशांत अडकून न पडते तरच नवल. म्हणूनच फ्रेडरिक पिनकट हा कायदेपंडित भारतीय विद्यार्थ्यांबद्दलच्या आत्मियतेमुळे त्यांना सांगते 'तुझी अडचण आता समजली. तुझे सामान्य वाचन फार कमी आहे. तुला दुनियेचे ज्ञान

नाही. वकिलाचे त्याशिवाय चालायचे नाही. तू तर हिंदुस्थानचा इतिहासही वाचलेला नाहीस. वकिलाला मनुष्यस्वभावाची पारख असली पाहिजे. त्याला चेहेऱ्यावरून माणसाचे अंत:करण ओळखता आले पाहिजे. शिवाय प्रत्येक हिंदुस्थानी इसमाला हिंदुस्थानच्या इतिहासाचे ज्ञान तर जरूर असले पाहिजे. तू के आणि मॅलेसनचे १८५७ च्या बंडाचे पुस्तकही वाचलेले दिसत नाहीस. तेवढे तर लगेच वाचून टाक. आणि या दोन पुस्तकांची नावे देतो ती माणसांच्या पारखीसाठी वाचून काढ.' (आत्मकथा पृ.५७) आणि यावर गांधीजींची प्रतिक्रिया —

'पिनकटच्या सल्ल्याचा प्रत्यक्ष उपयोग थोडाच झाला. त्यांच्या सांगण्यावर श्रध्दा ठेवली की वकिली करण्यासाठी फिरोजशा मेहतांची बुध्दिमत्ता, स्मरणशक्ती वगैरेंची आवश्यकता नाही. प्रामाणिकपणा आणि कळकळ एवढ्याने काम भागेल. या दोहोंचे भांडवल माझ्यापाशी भरपूर होते.' (आत्मकथा पृ.५७)

प्रा. सारथी म्हणतात —

'एवढी मात्र गोष्ट खरी की, पुढे त्यांनी राजकारणात जे निर्णय घेतले त्यांवर इतिहासापेक्षा इतर घटकांचाच प्रभाव होता.' (पृ.१२७)

(लिहू नये पण मोह होतो. अठरा महिन्यांच्या लहानशा वास्तव्यात चिरोलकेसच्या गांजणाऱ्या धकाधकीच्या मामल्यांत लोकमान्य तिथल्या ग्रंथालयात खाल्डिया संस्कृतीचा अभ्यास करतात, लेबर पार्टीशी संबंध प्रस्थापित करतात अथवा पाच एक वर्षाच्या उप्लवी उद्योगांमध्ये गर्क असलेले सावरकर अनेक समारंभ सभा घडवतात, एक संघटना बांधतात, राजसत्तेला हादरा देतात, मॅझिनी स्वातंत्र्य-समर लिहितात, युरोपभर क्रांतिकार्याचे जाळे विणतात आणि बॅरिस्टरीचा झगा अंगावर चढवून येण्याऐवजी कैदी म्हणून परततात. प्रा. सारथींनी ह्या तुलना टाळल्या. ज्येष्ठ विचारवंतांना टाळता आल्या नाहीत. प्रा. सारथी कधीही मर्यादेच्या बाहेर पाऊल न टाकता विश्लेषणाचा धागा घट्ट धरूनच ठेवतात. तेच ह्या ग्रंथाचे खरे सामर्थ्य!)

असो. इंग्लंडमधील वास्तव्याची ही कथा. आता दक्षिण आफ्रिका प्रकरण बघू या —

आफ्रिकेत जाताजाताच त्यांचा कप्तान हवशी स्त्रियांच्या वाडीत नेतो. खरं तर असे प्रसंग गांधीजींवर पुन्हा पुन्हा यावेतच का? प्रा. सारथी म्हणतात- 'वस्तुस्थिती अशी आहे की, एखाद्या व्यक्तीचा विवाहबाह्य संबंधाकडे मानसिक कल असल्याखेरीज त्याला दुसरा कोणी वेश्यागमनाची भीड घालणार नाही. कप्तानाने गांधी आणि एक मित्र यांचीच निवड का केली? उत्तर उघड आहे, कप्तान आणि गांधी दोघेही एकाच केबिनमध्ये राहात होते. गप्पामधून कप्तानाला जाणवले असणार की गांधीचा वेश्यागमनास विरोधी मानसिक कल नाही'... त्यांच्या संस्कारांनी कामसक्तीवर मात केली. पण गांधीजी श्रेय परमेश्वराला देतात कारण परमेश्वर त्यांचा सहाय्यकारी होता, हे त्यांना वाचकांच्या मनावर बिंबवायचे होते.' (पृ. १३९)

पुढे हिंदुस्थानात ह्याच परमेश्वराची जागा त्यांच्या 'आतल्या आवाजाने घेतली-

आत्मनिष्ठेचे मोठे स्वरूप!'

कोर्टात आल्याआल्याच त्यांनी घातलेल्या पगडीमुळे वादंग झाले. कोर्टाने ती पगडी काढून टाकण्यास सांगितले. गांधीजींनी नाकारले ते कोर्ट सोडून गेले व स्वत:चे व पगडीचे समर्थन वर्तमानपत्राकडे पाठवले. अनायसे उलट सुलट प्रतिक्रिया झाल्या आणि गांधींची प्रसिध्दि झाली. गांधीजी प्रसिध्दीची महती प्रथमपासून जाणून होते, इथे फळ मिळाले. पुढे रेल्वेच्या डब्यातून हुसकले गेल्यावर त्यांची संघर्षाची-अर्थात् सक्रिय अहिंसेच्या पध्दतीची सुरुवात झाली. स्टेशनवर साहेबी पोषाख करून जाणारे गांधीजी त्यांना स्टेशनवर अब्दुलगनी शेठ सारखी मोठी असामी पोहोचवायला आली एवढ्या कौतुकाने सुखावतात. इथे साहेबी पोषाख तर पुढे भारतात पंचा नि उपरणे एवढ्यावर वावरणारे गांधीजी दौऱ्यामध्ये जमणाऱ्या गर्दीमुळे असेच सुखावलेले असणार. वाढत होती आत्मनिष्ठा आणि त्याबरोबरच आत्मविश्वास!

त्यांच्या एका बलस्थानाचे विवेचन प्रा. सारथी करतात, 'गांधीजी क्षेत्र निवडून उपदेशकाच्या भूमिकेतून छाप टाकीत असत. उपदेशकाची भूमिका गांधींची अत्यंत आवडती, कारण त्या भूमिकेतच त्यांचा आत्मविश्वास जागृत होत असे. भिन्न पातळीवरील किंवा समविचारी लोकांचा सहवास आणि उपदेशकाची भूमिका ही दोन पथ्ये त्यांनी आयुष्यभर पाळली. आणि तेच त्यांच्या आत्मविश्वासाचे रहस्य होते. उदा. व्यापाऱ्यांना त्यांनी सत्याचा उपदेश केला. क्रांतिकारकांना अहिंसेची शिकवणूक दिली. विज्ञाननिष्ठांत ते अध्यात्मवादी होते. कायद्याचे राज्य असलेल्या ब्रिटिश साम्राज्यात त्यांनी कायदेभंगाचा मार्ग अनुसरला. न्यायालयात निरपराधित्व सिध्द करण्याऐवजी अपराधाची कबुली देऊन जास्तीत जास्त शिक्षेची मागणी केली. प्रचलित प्रथेच्या विरोधात जाऊन त्याचे तत्त्वज्ञान करणे, ही त्यांच्या आत्मविश्वासाच्या मागची प्रेरणा होती. तिचे हळूहळू सवयीत रूपांतर होऊन काहीतरी लोकविलक्षण करणे ही त्यांची मानसिक गरज बनली. त्याचे पर्यावसान ब्रह्मचर्याच्या अघटित प्रयोगात झाले. पोषाखाच्या बाबतीत तेच. इंग्लंडला पंचा नेसून गेले.' (पृ. १५०)

दक्षिण आफ्रिकेत गांधींनी आत्मविश्वास मिळवला, तो आयुष्यभर टिकवला. त्याला तडा गेला तो फाळणीपूर्व हिंदु-मुस्लीम दंग्यात! (पृ. १४९)

गांधीजींच्या एकंदर मानसिक ठाम भूमिकेबद्दल असंच सुंदर विवेचन प्रा. सारथींनी केलं आहे —

'कार्य करावयाचे तर दृष्टिकोन हवा. साहजिकच दुसऱ्याच्या दृष्टिकोनाबद्दल त्यांनी केवळ वरकरणी आदर बाळगला तरी आपल्या दृष्टिकोनातून तो चुकीचा असण्याची शक्यता संभवते हे त्यांचे गृहीतक सतत राहिले. गांधींनी सार्वजनिक जीवनात नेमकी हीच भूमिका घेतली. आपल्या मताबद्दल ठाम विश्वास, दुसऱ्याच्या दृष्टिकोनाबद्दल मानभावी आदर पण तो चुकीचा असल्याची खात्री हे त्यांचे राजकारणातील सूत्र अखेरपर्यंत राहिले. दुसऱ्याचे मतपरिवर्तन करण्यासाठी आत्मक्लेशाची जोड त्यांनी त्यांच्या सत्याच्या तत्त्वज्ञानाला दिली. त्याची प्रेरणा अनुव्रतांपासून मिळाली. त्यातून निष्पन्न झाली ती आपली मते दुसऱ्यांवर लादण्याची प्रवृत्ति.

आत्यंतिक सहिष्णुतेचे तत्त्वज्ञान गांधींच्या हाती अखेर विरोधकांवर अश्लाघ्य दडपण आणण्याचे हत्यार बनले. इतकेच नव्हे तर स्वत:च्या मताच्या सत्यतेबद्दल खात्रीने त्यांना विरोधही सहन होईनासा झाला....

सत्य आणि अहिंसेचा उपयोग सत्याग्रहात केला. अपरिग्रहातून संपत्तीच्या बाबतीत विश्वस्ताची कल्पना विकसित केली, तर अस्तेयाच्या संदेशातून गरीबीचे अथवा आत्मक्लेशाचे तत्त्वज्ञान निर्माण झाले. (पृ.१३१)

ह्या ग्रंथातील 'दक्षिण आफ्रिकेतील साहस' हे प्रकरण मात्र त्यामानाने घटनाप्रधान आहे.

पगडी प्रकरण, रेल्वेप्रवास, न्यायप्रकरणात तडजोडी, हिंदी लोकांच्या मताधिकारांवरील गंडांतर, गोरे व्यापारी व हिंदी लोक ह्यांतील संघर्ष, १८९४ नाताळ काँग्रेसची स्थापना, टॉलस्टॉय रस्किनच्या ग्रंथाचा प्रभाव, १८९६ मध्ये पुन्हा आफ्रिका तेथे मारहाणीतून पोलिस सुपरिटेंडेटमुळे सुटका, १८९९ मध्ये बोअर युध्दातील शुश्रुषा पथकाचे नेतृत्व, प्लेगच्या काळातील कार्य, बोटांचे ठसे घेण्याच्या कायद्याचा विरोध, ट्रान्सवाल, जोहान्सवर्ग येथील लढे, तेथील मजुरांचे प्रश्न, काळ्यागोऱ्यांचे विरोध, शिवाय टॉलस्टॉय फार्म, फिनिक्स आश्रम येथील प्रयोग अशा अनेक गुंतागुंतीच्या प्रकरणात महात्माजी अडकून पडलेले आहेत. आणि मुळात एक वर्षभर राहण्याकरता आलेले तेच गांधीजी आता तब्बल वीस वर्षे तिथे आहेत. ह्याही काळात त्यांच्या कुटुंबियांबद्दल बरेचसे अनुदार असे त्यांचे वर्तन आहे. आश्रमीय वागणुकीवर भर, त्यातून स्वत:सारख्यांना मिळालेल्या उच्चशिक्षणापासून मुलांना वंचित ठेवणे, कस्तुरबांना अप्रिय गोष्टी करून आपली हुकुमत गाजवणे सुरू झाले. ह्या काळातील त्यांच्या अनुभवाबद्दल ते सांगतात —

'ब्रिटिश साम्राज्यामध्ये मला जे स्वातंत्र्य मिळाले, ते अन्यत्र मिळाले नसते - ब्रिटिश साम्राज्यात काही ध्येये आहेत. त्यापैकी एक ध्येय असे की ब्रिटिश साम्राज्यातील प्रत्येक प्रजाजनाला आपल्या विवेकास पटणारे कोणतेही कार्य करण्यास व आपली शक्ती वापरण्यास आणि प्रयत्न करण्यास पूर्ण मोकळीक आहे. मला असे आढळले आहे की ब्रिटिश साम्राज्यामध्ये माझ्यावर कमीत कमी शासन राहील. म्हणून ब्रिटिश साम्राज्यावर माझी निष्ठा आहे.' मद्रास बार ॲसोसिएशनसमोर भाषण २४ एप्रिल १९१५. (पृ.२४०)

त्याच काळातील एक महत्त्वाचा मानसिक धागा प्रा. सारथी उलगडून ठेवतात- 'हिंदुस्वराज्य लिहून झाल्यानंतर असे दिसते की आधुनिक संस्कृतीच्या आधारे हिंदुस्थानात जी राजकीय चळवळ सुरू होती, तिच्याबद्दल गांधींना तुच्छता वाटू लागली होती. तिच्या पुढाऱ्यांबद्दल गांधींना जो आकस वाटू लागला होता, त्याच्या मुळाशी ही तुच्छताच असावी. गांधींना आत्मगौरवाच्या भावनेने ग्रासले होते. आकस ही आत्मगौरवाचीच दुसरी बाजू होय. आकस हा शब्द मी विचारपूर्वक वापरत आहे. कारण त्यातही एक पध्दत होती. कारण जे प्रस्थापित नेते होते, त्यांच्याविरूध्दच गांधी ही भावना व्यक्त करीत असत. त्यांना दूर केल्याशिवाय श्रध्दावंतांचे वादातीत सेनापतीपद गांधींना मिळू शकणार नव्हते. दुसरे म्हणजे, गांधी वरकरणी स्तुती करीत असत, पण न बोलून अथवा खाजगी पत्रातून ते आपली

मळमळ व्यक्त करीत. याचे एक ढळढळीत उदाहरण म्हणजे, गोपाळकृष्ण गोखले. उघडपणे स्तुति करताना गांधींनी शब्दांची उधळण करण्यात कोणतीही काटकसर केलेली नाही, अगदी आत्मकथेपर्यंत पण मगनलाल गांधी यांना लिहिलेल्या पत्रात गांधी वेगळाच सूर पकडतात.' (पृ.२६५)

२७.०१.१९१० चे पत्र त्यात मजकूर असा

'सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीबद्दल वाचून खेद वाटला —

हिंदुस्थानात मोठ्या इमारतींची जरूर कशाला?... एम.ए. किंवा बी.ए. झालेल्यांनाच सेवक होता येईल ही काय वेडगळ समजूत. फिनिक्सचे ध्येय व जीवनविषयक कल्पना भारत सेवक समाजापेक्षा अधिक श्रेष्ठ आहेत आपण करीत आहोत ते खरेखुरे कार्य आहे, पुण्यात चालले आहे ते खरेखुरे नाही. फिनिक्ससुध्दा नेता आहे पण पुण्याच्या डामडौलापेक्षा अधिक चांगला आहे. गोखले व सहकाऱ्यांबद्दल आमचा आदर आंधळा नाही.... साक्षरतेचा बडेजाव व ऐहिक विद्या यातून असे गांधीजींच्या विचारांचे आडवे उभे धागे.

वरील आपल्या विवेचनास प्रमाण म्हणून प्रा. सारथी लिहितात,

'विरोधकाशी गांधी सौजन्याने वागत पण त्यातही एक सूत्र होते. विरोधक वलिष्ठ असला तरच गांधींची त्याच्याशी वागणूक सौम्य असे. एरवी नव्हे. बॅरिस्टर जीनांना हे सौजन्य दाखवण्यास आले नाही, पण कायदे आझम जीना मात्र त्याचे हकदार झाले. गांधींचा विरोध पत्करून सुभाषचंद्र बोस काँग्रेसचे अध्यक्ष म्हणून निवडून आले, त्यांच्यापुढे अडचणींचा डोंगर उभा करण्यात आला. राजीनामा देणे भाग पडले. शिस्तभंगाची कारवाई झाली. आपल्या सेनापतिपदाच्या शर्यतीत ज्यांचा अडथळा होईल, असे गांधींना वाटे त्यांच्यासंबंधी लिहिताना वा बोलताना गांधी सौजन्यानेच वागत असत असे म्हणता येणार नाही. टिळकांविषयी त्यांनी वापरलेली भाषा निश्चितच सौजन्याची नव्हती.'' (पृ.२७५)

९ जानेवारी, १९१५ ला गांधी मुंबईला लंडनहून आले. आल्याआल्या सरकार स्वीकारत अँड्रयूज यांच्या भेटीला शांतिनिकेतनात गेले. १९-२-१५ ला गोखल्यांचे निधन झाल्याबरोबर तातडीने पुण्यास जाऊन भारत सेवक समाजाला सभासदत्वाचा अर्ज दिला.

इथून पुढे भारतातील राजकारणाला सुरुवात होणार होती. गोखले व त्यांच्या भारत सेवक समाजाने सुचवल्याप्रमाणे त्यांनी देशभर परिस्थितीचे निरीक्षण केले ते सर्वंकष होते त्यानंतरच्या त्यांच्या कार्यक्रमास आवश्यक काय होते व ते काय करणार होते ह्याबद्दल प्रा. सारथी म्हणतात —

'हिंदुस्थानात सर्वंकष परिवर्तन होण्याची निकड, पण त्यासाठी गांधींकडे कोणताही संघटनात्मक कार्यक्रम नव्हता. त्यांच्या व्यक्तिमत्त्वातील करिष्मा लोकांना आकृष्ट करू शकत होता पण विधायकरीत्या कार्यश्रवण करू शकत नव्हता... वेळप्रसंगी त्याग करून मिशनरी वृत्तीने ते लोकशिक्षणासाठी जीवन व्यतीत करणार का असा प्रश्न त्यांच्यापुढे उभा रहावयास हवा होता, तो गांधींना पडला नाही. गांधींच्या राजकीय महत्वाकांक्षेमुळे असे जीवन व्यतीत करणे त्यांना पटणारे आणि परवडणारे नव्हते. साहजीकच हिंदुस्थानच्या उन्नयनाचा बिकट

मार्ग सोडून लोकप्रियता आणि तिच्या सहाय्याने यथाकाळ राष्ट्रीय संघर्षाचे सेनापतिपद देणाऱ्या राजकारणाचीच त्यांनी कास धरली. खरे तर राजकारणात त्यांनी पडण्याची काहीही गरज नव्हती. लो. टिळक, दास, बेझंट,जीना,मोतीलाल नेहरू, माल्वीय असे अनेक धुरीण राजकारणात होते. त्यांच्या पध्दतीने त्यांचे कार्य चालूच होते. त्यांच्या राजकारणामुळे कदाचित् स्वातंत्र्य मिळवण्यास विलंब झाला असता. पण गांधींना त्याचे दु:ख होण्याचे कारण नव्हते. कारण इंग्रजांना घालवणे म्हणजे 'स्वराज्य' नव्हे हे त्यांनी अनेक वेळा सांगितले होते. राजकारण इतरांवर सोडून त्यांना स्वत:ला अभिप्रेत असलेल्या 'स्वराज्य' साठी त्यांनी कार्यरत होणे, हेच त्यांच्या सद्सद्विवेक बुध्दीला धरून झाले असते. मागे वळून पाहता तेच देशाच्या हिताचे झाले असते असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही —

हिंदस्वराज्य मध्ये गांधींनी पार्लमेंटला वेश्या म्हटले आहे. वेश्यावृत्तीच्या दिशेने राजकारण चालू होते. असे असता सद्सद्विवेकबुध्दीशी प्रतारणा करून गांधींनी राजकारणाच्या दलदलीत का उडी घेतली असावी? त्याचे उत्तर एकच असू शकते. ते म्हणजे, जुन्या राष्ट्रीय पुढाऱ्यांना निष्प्रभ करून राष्ट्रीय लढ्याचे सेनापतिपद भूषविण्याची त्यांची महत्वाकांक्षा. त्यांचा चरित्रपट जसजसा उलगडत जातो, तसतसे त्यांचे परिपूर्ण नियोजन अभ्यासून वाचक स्तिमित होतो. आता राजकीय क्षेत्रात पडावयाचेच होते, तर राजकारणाचे नियम तरी प्रामाणिकपणे पाळावयाचे. पहिला नियम हा असतो की जे अधिकार मिळतील ते राबवायचे आणि अधिकाकरता संघर्ष करावयाचा. गांधींना कोणत्याही चौकटीत संसदीय वा अन्य काम करणे स्वभावत:च अशक्य होते. त्यामुळे ते राजकारणात दाखल झाले ते राष्ट्रीय चळवळ आपल्या नियंत्रणाखाली राहावी, या एकमेव उद्दिष्टाने! गांधींना अधिकार राबविण्यात रस नव्हता. त्यांना सवय होती, फक्त एकाधिकार गाजविण्याची. त्यामुळे अमृतसर काँग्रेसने केलेला आणि त्यांनी स्वत:पाठिंबा दिलेला ठराव संधि मिळताच मोडीत काढला आणि राजकारण सत्याग्रहाच्या दावणीला बांधले. अशा तऱ्हेने संसदीय पद्धतीचा शिक्षणपाया जो खुद्द गोखले यांनी घालून दिला होता, त्याची गांधींनी वासलात लावली. परिणामी समाजाचे उन्नयन झाले नाही, राजकीय शिक्षणही मागे पडले, राजकारण उद्दिष्टहीन झाले. स्वातंत्र्य मिळाले तरी 'पिढ्यान् पिढ्या चालून आलेल्या सवयी' नष्ट झाल्या नाहीत. त्याचे फलित आज सर्वत्र पहावयास मिळत आहे. राष्ट्रीय चळवळ आपल्या नियंत्रणाखाली आणण्याचा प्रक्रियेत राजकारण म्हणजे निव्वळ संख्या हे समीकरण त्यांनी सुरू केले आणि अखेर त्याचे रूपांतर झुंडशाहित झाले. सुदैव एवढेच की राजकारणाचे हे अजब अध्यात्मकीकरण पाहण्यास गोखले हयात नव्हते (पृ. ३००-३०२)

पुढच्या काळातील घटनांचा मी केवळ कालक्रमानुसार उल्लेख करतो. बनारस हिंदू युनिव्हर्सिटीत भाषण, चंपारण्य लढा, अहमदाबाद गिरणी कामगारांचा संप, सैन्यभरती, रौलटकायदा, जालियनवाला बाग, लोकमान्याचा मृत्यु, चौरीचुरा दंगल, अपेंडिक्स शस्त्रक्रिया, स्वराज्य पक्षस्थापना, कोहटची दंगल, सायमन, कमिशन, भगतसिंग प्रकरण, आणि इथे १९२९ साल संपते —

१-१-३० स्वातंत्र्यठराव, दांडीयात्रा, अल्पसंख्य करार, गोलमेज परिषद, येरवडा करार, वर्ध्यास स्थलांतर, हरिजन यात्री, विहारभूकंप, काँग्रेसला निरोप, मंत्रिपद, हरिपुरा काँग्रेस, दुसरे महायुद्ध, वैयक्तिक सत्याग्रह, काँग्रेसचा पुन्हा राजीनामा आणि इथे १९४१ संपते—

भारतातील १९१५-१९२० हा काळ त्यांचा काँग्रेसमध्ये महत्त्वाचे स्थान मिळवण्याचा आहे. १९२०-१९२५ हा काळ खिलाफत चळवळ व असहकारिता चळवळ चालवून नेतेपद आपल्याकडे घेताना स्वराज्य पक्षास व पुढाऱ्यांना हतप्रभ करण्याचा आहे. १९२५-२८ हा काळ राजकीय विजनवासात अन्य छोट्या चळवळींचा आहे. १९२८-३४ पुन्हा चळवळ माजवण्याचा व गोलमेज परिषदेचा आहे. १९३४-३७ ते पुन्हा आत्मचिंतनात आहेत. १९३८-४१ पुन्हा काँग्रेसवर पकड घेत आहेत. अशा प्रकारे हा काळ चढउतरण 'अप्स अँड डाऊन्स' चा आहे; पण गांधीजी आपल्या धूर्त आखणीने राजकीय पटावर आपले स्थान सर्वांना खपेल वा खुपेल तरीही टिकवून आहेत. त्यांची हत्यारे आहेत संघर्ष, सत्याग्रह, तडजोडी, उपोषणे, परिषदा आणि पुन्हा 'येरे माझ्या मागल्या—'

ह्या कालखंडांतील घटनांबद्दल न सांगता आपण प्रा. सारथी 'शोध' कुठल्या अंगानं घेत आहेत ते पाहणार आहोत. त्यासाठी वर दिलेले पृ. ३००-३०२ वरचे प्रदीर्घ अवतरण बरंच महत्त्वाचं आहे. आता घटनांचं विश्लेषण कसं करतात ते पाहू. आणि विशेष म्हणजे पहिल्या खंडातील दोनशेंहून अधिक पाने ह्याच काळावर खर्च झाली आहेत. पुढचा दुसरा खण्ड पाच-एकशे पानांचा बाकी आहेच.

'खिलाफतीचा प्रश्न मात्र त्यांच्या धर्मभावनेशी आणि महत्त्वाकांक्षेशी सुसंगत असल्यामुळे त्यांना झटदिशी उमगला. (याच प्रकारे) त्यांनी जीना व आंबेडकर यांना मुस्लीम व अस्पृश्य यांच्या नेतृत्त्वापासून वंचित करण्याचा प्रयत्न केला. आंबेडकरांच्या बाबतीत तो काही प्रमाणात यशस्वी झाला; पण जीनाच्या बाबतीत मात्र उलट... त्यांची महत्त्वाकांक्षा आधुनिक भारताचा प्रेषित होण्याची होती. 'प्रेषिताप्रमाणे ते काही वेळा कठोरही होत. पण त्यांना माहीत करून घ्यायचे नव्हते की प्रेषित ही संस्था विसाव्या शतकास कालबाह्य झालेली होती.' (पृ.३१४)

'चंपारण्यातील सत्याग्रह आदर्श सत्याग्रह होता. टिपणे, पत्रे समस्या समजावून घेण्यासाठी केलेली मेहनत, सरकार व मळेवाल्यांविरुद्ध उभे राहण्यात दाखवलेले धाडस, संघटनाकौशल्य, भाषेवरील हुकूमत, हजरजबाबीपणा, निरलसता, उत्त्साहाने कार्यकर्त्यांनाही झपाटून टाकण्याचा उत्साह, शेतकऱ्यांबद्दल वाटणारी खरीखुरी तडफड, विरोधकांबद्दल दाखवीत असलेले सौजन्य यांचे दर्शन जणू दैवी होते; याचे कारण निखालस कर्तव्यबुद्धीने गांधींनी चालवलेले ते आंदोलन होते.' (पृ. ३१९)

मला वाटतं प्रा. सारथी महारथींची बलस्थाने अगदी मोजक्या शब्दांत मोठ्या सामर्थ्याने दाखवू शकतात.

'कॉमन्स सभेचा इतिहास म्हणजे घोडचुकांचाच इतिहास आहे. एक अरबी भाषेतील म्हण आहे. माणूस म्हणजे मूर्तिमंत चूक. चुका करण्याचे स्वातंत्र्य आणि त्या चुका दुरुस्त करण्याची सत्ता हीही एक स्वराज्याची व्याख्या आहे. पार्लमेंट असणे म्हणजे अशा प्रकारचे स्वराज्य

होय.' म. गांधी ३-११-१७ भाषण-भाष्य एका ओळीत —

'राजकीय सोयीसाठी अखेर गांधींनी हिंदुस्थानातील राजकीय चळवळीचे उद्दिष्ट मान्य केले.' (पृ. ३३५)

'अर्थात हा निव्वळ लोकानुनय होता आणि त्या अर्थाने डावपेचाचा भाग होता. डावपेचाने व्यक्तिगत यश मिळाले, तरी राष्ट्राचे प्रश्न सुटत नसतात. दुर्दैवाने, गांधींच्या बाबतीत तेच झाले. त्यांना व्यक्तिगत यश उदंड मिळाले, पण त्यांच्या यशाच्या प्रत्येक टप्प्यावर हिंदुस्थानचे प्रश्न अधिकच जटिल होत गेले.' (पृ. ३३६)

'खेडा सत्याग्रहाच्या वेळी आपल्या आर्थिक मागण्यांसाठी गांधीचे नेतृत्त्व मान्य करणारे शेतकरी गांधींनी सैन्यभरतीची मोहीम काढली तेव्हा साधे सौजन्य दाखवण्यासही तयार नव्हते, हा खरा भारताचा आत्मा होता. बिहारमध्ये जाऊन समाजसेवा करण्यास कोणी तयार नव्हते, आपल्या असामाजिक सवयी सोडून देण्यास कोणाची तयारी नव्हती, विधायक कार्यात कोणाला रस नव्हता, असे अनुभव आले होते.' (पृ. ३५७)

हत्याकाण्ड-जालियनवाला बाग प्रकरण गांधींच्या रौलट कायद्याविरुद्धच्या निदर्शनातून उद्भवले. ते घडले १३ एप्रिल १९१९ ला. आणि गांधींजी प्रतिक्रिया व्यक्त करतात ४ नोव्हेंबर १९१९ला तब्बल सहा महिन्यांनंतर आणि कोणती —

'जालियनवाला बागेत आपले पुष्कळ लोक ठार मारले गेले हे खरे आहे, पण तेथे जमलेल्या एकूण एक माणसांना मारले असते तरीही आपण शांतता पाळावयास हवी होती.' (पृ. ३८०)

त्यावर प्रा. सारथी लिहितात —

'खिलाफत, रौलट यांसारख्या तात्कालिक समस्यात गांधी दंग झाले. सामान्य माणसाच्या कल्याणाशी अशा बाबींचा संबंध नसतो. तरीही गांधींनी राष्ट्राच्या शक्तीचा अपव्यय हे लढे लढण्यात का केला? स्वत:ला लोकप्रियता मिळवण्यासाठी, एवढेच त्यांचे उत्तर असू शकते.' (पृ. ३८६)

आता गाजलेले खिलाफत — (अखिल आफत) प्रकरण! त्यावर प्रा. सारथींचे विश्लेषण — दीर्घ आणि तितकंच मूलगामी —

'खिलाफत चळवळीला पाठिंबा देऊन राजकारणांतील आपल्या एकमुखी नेतृत्त्वाला मुसलमानांचा पाठिंबा मिळवण्याची गांधींची योजना कल्पक आणि हुषारीची होती; पण तितकीच अव्यवहारी होती. कारण त्यात इस्लामचा इतिहास आणि संस्कृती याबद्दलचे संपूर्ण अज्ञान प्रतिबिम्बित झाले होते. गांधींनी खरं तर पाठिंबा दिला नव्हता तर पुढाकार घेतला होता. मुसलमान बंधूंनी सत्याग्रहाचा स्वीकार केला म्हणजे सत्यग्रहाचे नेते या नात्याने गांधी मुसलमानांचेही पुढारी होतील. रौलट कायद्याने ते हिंदूंचे नेते झालेच होते, पण हिंदू-मुसलमानांचे राष्ट्रीय पुढारी असे स्थान प्राप्त झाले असते.

....तथापि गांधींची गणिते चुकली. कारण त्यांची अनेक गृहीतके चुकीची होती. रौलट चळवळीत हिंदूंनाही अहिंसा पाळता आली नव्हती. अशा परिस्थितीत मुळातच आक्रमक

असलेला इस्लाम अहिंसेचा स्वीकार करील हे शक्य नव्हते. ही चळवळ पॅनइस्लामिक चळवळीचा भाग होता. उलट मुसलमान हिंदुस्थानात आहेत पण हिंदुस्थानचे नव्हेत ही अलगतावादी भावनाच निर्माण होण्याचा धोका होता, मुल्ला मौलवींचे प्रस्थ वाढणार होते, बिगर मुस्लीमांचा उपयोग संपला की रस काढून घेतलेल्या चोयटीप्रमाणे त्याला फेकून देतील याचीच शक्यता जास्त होती. १९१६ पासून राष्ट्रीय प्रवाहांत मुसलमान येण्याच्या प्रक्रियेस व जीनासारख्या राष्ट्रवादी मुसलमानासच मानाचे स्थान देऊन नेतृत्व त्याचेकडे कसे राहील यासाठी प्रयत्नशील होते याची गरज होती.' (पृ. ३९२-३९३)

'आधुनिक भारताला सुरुवात झाली. गांधींनी राष्ट्राचे भवितव्य खिलाफत चळवळीसाठी पणाला लावले आणि या द्युतात भाग घ्यायला अनेक जण तयार झाले.'' (पृ. ३९३)

एकदा मुसलमानांची खिलाफत चळवळ तिकडे तुर्कस्थानातील परिस्थितीमुळेच संपली आणि मग त्यांच्या द्वेषाची दिशा सरकारऐवजी हिंदूकडे वळवून 'मोपला बंड' उद्भवले त्याबद्दल —

'मोपल्यांच्या बंडांत गांधींनी अहिंसा, शांतता इ. सत्याग्रहाच्या मूलतत्त्वांचा बळी पडलेला उघड्या डोळ्यांनी पाहिलं. एवढेच नव्हे तर त्यावर कडी करून वचनभंग करून स्वहस्ते सत्याचा आणि नीतीचा बळी दिला. त्यांच्या महात्मापदाशी हे कितपत सुसंगत होते?' (पृ. ४५६)

अत्याचार होता क्षणीं सहकार्य थांबवीत हे वचन न पाळणारा हा महात्मा हरिश्चंद्राचे संस्कार विसरतो-कारण

'खिलाफतवादी मुसलमानांमध्ये आपली लोकप्रियता टिकवून धरण्यासाठी अत्याचाराकडे दुर्लक्ष करणे आवश्यक होते. एरवी त्याचे सेनापतीपद धोक्यात आले असते. सत्य, अहिंसा, शांतता ही सर्व तत्वे सेनापतीपदापुढे दुय्यम होती. '' (पृ. ४५७)

शिवाय —

हिंदूंचा खिलापतीला पाठिंबा मिळाला, तरच नेतृत्व (उभय जमातींचे) शक्य होते. आपला ज्याच्याशी काहीही संबंध नाही, अशा भावनिक प्रश्नासाठी राष्ट्रहिताचा बळी देण्यास तयार असणारी हिंदूसारखी भोळसट जात जगाच्या पाठीवर गांधींना दुसरीकडे कोठेही सापडली नसती... हिंदूना असहकारिता आंदोलनाकडे आकृष्ट करण्यासाठीच फक्त पंजाबवरील अन्याय खिलाफतीच्या जोडीला बसवला, असा निष्कर्ष पुढील वस्तुस्थितीच्या आधारे काढता येण्यासारखा आहे.' (पृ. ४६९)

ह्या सर्वांचे कारण —

'गांधी महात्मा असले, तरी मुत्सद्दी नक्कीच नव्हते. फार तर राजकारणी होते.

जातीय ऐक्याचा हेतू स्तुत्य महात्मापदाला शोभणारा पण प्रत्यक्षात उतरू शकेल का याचा ऐतिहासिक दृष्टीकोनातून विचार केला नव्हता.' (पृ. ४९७)

भारताचा इतिहास न जाणणारे महात्माजी Pan Islamism काय ओळखणार? पण अघटित घडले, इतिहास न जाणणाऱ्याने भूगोल बदलवला.

आता खण्ड दोन चा विचार-हाही चांगला साडेपांचशे पृष्ठांच्या वर! पूर्वीसारखाच असंख्य अवतरणांनी भरलेला-प्रा. सारथी यांचे लेखन म्हणजे इतिहासकाराच्या भूमिकेसारखंच. 'ना मूलं लिख्यते किंचित।' वा 'झाडा देईन पदोपदी' पुन्हा कुणाला विवेचनाचा प्रतिवाद करावयाचा असेल तर मोकळीक आहेच. ह्या खण्डात १९२०-१९४२ हा कालखण्ड येणार. घटनांनी गजबजलेल्या काळात, आपल्याला एकतर सारं घडतंय ते भारतात म्हणून, व्यक्तिमत्त्वे माहित असलेली, तेव्हा उभे आडवे धागे पिंजून काढावयाचे हे काम! महावस्त्र काय, आणि पंचा काय-धागे उभे आडवेच!

१९२० सप्टेंबर कलकत्ता अधिवेशन-असहकार व खिलाफत हे प्रश्न. मुसलमानांना मुद्दाम मोठ्या संख्येने पाठवून ठरावाच्या बाजूने मताधिक्य करण्यात आले होते. गांधींनी सांगितले — 'दोन प्रांत सोडून सर्व प्रांतांनी ठरावाच्या बाजूने मतदान केले.' प्रत्यक्ष आंकडेच आहेत. 'स्पष्ट असे होते —' गांधी अवांछित सत्यापासून दूर आणि राजकीय चातुर्याच्या जवळ जाऊ लागल्याचे दर्शन घडते' इति सारथी (पृ. १९) पुढे वल्लभभाईंच्या जागी नेहरूंना आणून १९४५ मध्ये राजकीय वारस निवडीचे कसब गांधींनी दाखवले. (मला वाटतं — दादूमियाच्या अगदी अलिकडच्या ग्रंथात If Patel would have been First Prime Minister' ह्या ग्रंथाची पार्श्वभूमी हीच असावी.)

'शिस्तबद्धता, त्याग, संघटनशक्ती, आत्मविश्वास आणि धैर्य यांची गरज आहे. हे सर्व जर आपण एका वर्षात दाखवू, तर एका वर्षात स्वराज्य मिळवू.' गांधी २२-९-२०. मग गेली शंभर वर्षे राजाराममोहनरायांपासून हिंदी पुढारी काय सांगत होते? हे 'एका वर्षात स्वराज्य' गाजर कशासाठी? ज्या अवगुणांमुळे स्वराज्य जाते वा आले तर पांगळेच राहते त्या अवगुणावर मात करणारे हे वर उद्वेवंदेचे गुण एका वर्षात कसे काय अवतरणार? उलट १९४७ साली हे सर्व गुण आपल्याला सोडून गेले, खुद्द गांधींनाही त्यापैकी काही! या संदर्भात दक्षिण हिंदुस्थानातील एक रहिवासी एस्. एम्. मायकेल यांनी गांधींना एक पत्र लिहिलं ते मोठं आहे — मूळातून वाचावं! (पृ. २७, २८)

प्रा. सारथी म्हणतात — 'गांधी हिंदू होते आणि ते नेहमी आवर्जून सांगत, त्याप्रमाणे बनिया होते. यामुळे कोणत्याही घटनेपासून तात्कालिक फायदा कसा होईल, यावरच त्यांचे लक्ष केंद्रित असे — दीर्घकालीन नियोजन आणि सातत्यपूर्ण प्रयत्न यांचे त्यांना आणि हिंदी लोकांनाही पूर्ण वावडे होते. तात्कालिक फायद्यासाठी दीर्घकालीन हितसंबंध दृष्टिआड केल्याची उदाहरणे हिंदुस्थानच्या इतिहासात भरपूर मिळतात, तीच परंपरा गांधींनी पुढे चालवली. हिंदुस्थानच्या पुनरुत्थानाची संकल्पना डोळ्यांसमोर असूनही अखेर त्यांनी मुसलमानांच्या मदतीने काँग्रेस काबीज करण्यापुरताच आपला कार्यक्रम मर्यादित केला.' (पृ. २९)

(एका थोर समाजशास्त्रज्ञाने व एका अध्यात्मिक वाटणाऱ्या विचारवंताने तर गांधींमध्ये बनिया, बॅरिस्टर व बैरागी याचे मिश्रण होते याचेही सुंदर विवेचन केले आहे!)

गांधीजी आले आणि मोतीलाल नेहरू व दास वगळता राष्ट्रीय पुढारी सामाजिक औदासीन्याचे वाटेकरी झाले. त्याबद्दल 'त्यांचा अनुभव, बुद्धिमत्ता, कर्तृत्व, संघटना कौशल्य आणि सर्वात

महत्त्वाचे म्हणजे सुसंस्कृतपणा आदि मूल्यांवरची श्रद्धा यांचा पुरा लाभ समाजाला होऊ शकला नाही. हा प्रचंड राष्ट्रीय अपव्यय होता आणि प्रगती करू पाहणाऱ्या हिंदुस्थानसारख्या देशाला तो परवडणारा नव्हता पण गांधीयुगात निरपवाद नेतृत्त्व हेच, राष्ट्रीय प्रगतीऐवजी, काँग्रसचे उद्दिष्ट असल्यासारखे दिसून येते.' (पृ. ३७)

किती मोजक्या शब्दांत पुढच्या शोकांतिकेचे एक कारण!

'सभांतून अशिष्ट भाषा गांधींच्या उपस्थितीत बोलली जात होती आणि त्याचा निषेध करण्याऐवजी तो प्रकार गांधी स्वस्थ चित्ताने पाहात होते आणि गरज पडल्यास त्याचे वकिली समर्थनही करीत होते.' (पृ.४५)

अशा अपमानाच्या अनुभवाने जीनांचा ठाम ठोस 'काळापहाड' झाला!

[ पुढे गांधीजींच्या जीवनातील एक नाजुक स्त्री आकर्षणाचे प्रकरण दिले आहे — रवींद्रनाथ टागोरांची भाची व पंजाबमधील पुढारी पं. रामभुजदत्त चौधरी ह्यांच्या पत्नी. त्यांचा मुलगा गांधींच्या आश्रमात. त्यांना १-५-१९२० व १७-१२-२० रोजी गांधींनी लिहिलेली पत्रेच उपलब्ध करून दिली आहेत. एका पत्रात तर 'तुम्ही माझ्या 'पत्नी' आहा, याचे कारण आपल्या समान ध्येयाची अधिक परिपूर्ती तुम्हाला माझ्या ठायी आढळली आहे' असा उल्लेख आहे. बिचारी बाळबोध विचारांची कस्तुरबा ! ह्यावद्दल प्रा. सारथींचे विश्लेषण — १९२० मधील प्रयोग अशारीरिक होता. तर शेवटचे प्रयोग झाले त्यांना शारीरिक भीती होती. १९२० मध्ये ते फक्त तणावग्रस्त होते आणि शेवटच्या (१९४७) प्रयोगांच्या वेळी ते मनाने पूर्ण खचलेले होते, त्यामुळे हा फरक पडला असेल का? —(पृ. ६६)]

असहकारिता आंदोलन निमित्ताने —

'गांधीवादी आंदोलनांची पर्यायाने हिंदुस्थानाची तीच शोकांतिका होती. विध्वंसक शक्ती एकवटण्याचे असामान्य कर्तृत्त्व त्यांच्याकडे होते पण त्याला विधायक वळण लावणयास त्यांची आणि त्यांच्या अनुयायांची हिंदू मानसिकता संपूर्णपणे हतबल होती.' (पृ. ७१)

१९३६ मध्ये — 'सात लाख खेड्यांसाठी प्रत्येकी एक सभासद करण्याची गांधींची महत्त्वाकांक्षा होती. पण प्रत्यक्षांत मात्र फक्त ५१७ सभासद होते.' (पृ. ३६७) हे गांधीवादाचे यश !

'ह्याच सुमारास एका इंग्रजाने 'जॉन बुल' या टोपण नावाने गांधींना पत्र पाठवून आपल्या उणीवा दाखवल्या.' (पृ. ७७-७८) पत्र मननीय आहे मूळातूनच वाचावे.)

पुढे येते गांधीजींनी मोपल्यांना दिलेले 'मानपत्र'!

The Moplahs are the bravest in the land. They are God fearing. Their bravery must be transformed into purest gold. I feel sure that once they realise the necessity of non-violence for the defence of the faith for which they have hitherto taken life, they will follow it without furnishing" (पृ. ८७)

'साम्राज्यवादी उमराव साम्राज्याच्या मोहाने आंधळे झाले होते (संदर्भ डायरप्रशस्ति) आणि खिलाफत वाद्याच्या मैत्रीच्या मोहाने गांधीही विवेकाला पारखे झाले होते आणि

सत्याकडे जाणीवपूर्वक डोळेझाक करीत होते. तथापि अध:पात हा राजकारण्यांच्या बाबतीत स्वभावधर्म असतो तर महात्म्यांच्या बाबतीत तो घडणे प्रलयंकारी ठरण्याची भीती असते.' इति प्रा. सारथी (पृ. ८७)

आणि ती भीती खरीच ठरली — सन १९४७.

खिलाफत चळवळीतील व असहकार आंदोलनातील हिंसाचारास दिलेली वा गृहीत मान्यता लक्षात घेता —

'दंगल आणि राजकारण यांचे अतूट नाते हिंदुस्थानात निर्माण होऊ लागले होते हे नक्की. १९४२ च्या चळवळीत गांधींनी Do Or Die असा संदेश दिला होता. या 'Do' चा अर्थ दंगलीपलिकडे अन्य काही होता का? दंगलीमुळे अखेर इंग्रजांना काँग्रेसशी वाटाघाटी सुरू कराव्या लागतील असा अपसमज पसरला.... इंग्रजांविरूद्ध जे हत्यार स्वातंत्र्याच्या आंदोलनात वापरले गेले त्याचाच उपयोग मुसलमानांनी आपल्या चळवळीत केला' (पृ. १०८) केवढे सत्य आणि किती विदारक!

(आता आपण 'विधिमंडळ प्रकरण' पाहू. स्वराज्यपक्ष — त्याचा उदयास्त - १९२२ सालीच मिळणाऱ्या घटनेला १९३६ पर्यंतचा विलंब — मध्यंतरीचा गांधींचा राजकीय विजनवास क्रांतिकारक प्रयत्न — गोलमेज परिषद — काँग्रेस सोडणे सर्वांना विदित प्रयत्न हे ग्राह्य धरून विवेचन पाहू.)

'विधिमंडळाचे कार्य सुरू झाले की गांधींचे राजकारणातील स्थान नगण्य होणार व तसे झालेही. या जाचक वस्तुस्थितीविरुद्ध गांधींचा खरा लढा होता. हा लढा गांधींच्या महतीला पोषक असला तरी देशहिताचा नव्हता हे नंतरच्या अनेक घटनांनी सिद्ध केले. गांधी युगायुगीचे महात्मा झाले, पण देशाच्या प्रगतीत मात्र गतिरोध निर्माण झाला. तुरुंगात जाऊन, सत्याग्रहात मार खावून शारीरिक सहनशक्तीचे प्रदर्शन करण्याने आणि सूत कातण्याने देशाचे नेमके काय भले झाले ते गांधीवाद्यांनी तर्कशुद्ध पद्धतीने पटवून द्यावेत. तसे भले होत असते तर गोव्यासारख्या चिमुकल्या प्रदेशात सत्याग्रहींचा महापूर लोटला असता आणि भारत सरकारला सैन्य पाठवावे लागले नसते. सत्याग्रहाचा उपयोग ब्रिटिशांसारख्या राजवटीतच झाला तर होऊ शकतो. मला पुष्कळ वेळा वाटते की लोकहितदक्ष काँगेस जनांनी सत्याग्रह करण्यापेक्षा अगदी तलाठ्याची नोकरी करून प्रामाणिकपणाने शेतकऱ्यांना सात/बाराचे उतारे दिले असते आणि फावल्या वेळात साक्षरता प्रसार केला असता तरी खूप देशसेवा झाली असती.

वस्तुत: गांधीचे राजकारण हे संपूर्णपणे त्यांचे व्यक्तिगत राजकरण होते... व्यक्तिवाद हे हिंदुधर्माचे वैशिष्ट्य आणि सामाजिक वैगुण्य.

नवीन राजकीय अधिकार योग्य प्रतिनिधींकडून राबवले असते तर हिंदी लोकात सामाजिक जाणीव निर्माण होण्याची शक्यता होती, पण गांधींनी राजकारणाचे गाडे उलटवले आणि त्याला व्यक्तिवादी राजकारणाकडे लोटले.' (पृ. १५८-१५९)

काळाने सूड उगवला — चऱ्हाटें वळली गेली — परिषदा झाल्या — नेहरूरिपोर्ट झाले — सायमन कमिशन आले गेले — १९३७ ला काँग्रेसी मंत्रिमंडळे आली आणि युद्ध

उंबरठ्यावर आहे याचा अंदाज येऊनही सत्ता राबवण्याची संधी, नव्या आपत्कालातील अनुभव ह्या गोष्टी राजीनाम्याने दवडल्या गेल्या. परिणामी ब्रिटिश व जीना मोकळे राहिले — प्रथम वैयक्तिक सत्याग्रह (१९४०) आणि पुढें 'करा किंवा मरा' (१९४२) मुळे काँग्रेसी नेते गजाआड गेले — पुढची फरफट दिसलीच!

महात्माजींच्या व्यक्तिगत राजकारणात आत्मनिष्ठा. स्वयंकेंद्रितता, अहंकार, स्पर्धकांना दूर करणे, स्वत:चे निरंकुशत्व, क्वचित् हुकूमशाहीकडील वृत्ति, परिणामी वैतागलेले आणि थकलेले ज्येष्ठ अनुयायी आणि समोर जीनांसारखा अपमानित प्रतिस्पर्धी ह्या साऱ्या गोष्टी कितपत महत्त्वाच्या याचे स्वरूप घटनांमागील संदर्भांनी प्रा. सारथी ह्यांनी स्पष्ट करताना, विस्ताराने सांगतांना उत्तरार्धाची जवळजवळ दोनशे पाने खर्ची घातली आहेत — असा एक प्रयत्न हवाच होता! त्यातील वानगीदाखल काही पाहू!

'कायदेभंगाने स्वराज्य पाहिजे असेल तर आपण अनत्याचारी वातावरण निर्माण केले पाहिजे. भाषणे करण्याऐवजी कताईची प्रात्यक्षिके दाखवली पाहिजेत — ' गांधी (पृ. १८१) इथपर्यंत ठीक! पण पुढे — 'मला शक्य झाले तर माझ्याशिवाय काँग्रेस संघटनेतील प्रत्येक सभासदाला भाषणाची बंदी करीन — स्वराज्य मिळेपर्यंत ही बंदी राहील.' (पृ. १८१) काटा कुठे झुकतोयू!

'नेहरू जीना यांचा पक्ष मध्यवर्ती कायदेमंडळात चांगले कार्य करीत होता. दासांसह तर तिघेही राष्ट्रवादी व दोन मोठ्या संघटनांचे प्रतिनिधी होते. कोणालाही निरपवाद राष्ट्रीय नेतृत्त्वाची महत्त्वाकांक्षा नव्हती. सर्वात महत्त्वाचे म्हणजे समस्या सोडवण्याची त्यांची इच्छा होती.' इति प्रा. सारथी (पृ. २१६) 'पण दास गेले आणि टिळकांनंतर गांधींचा रस्ता मोकळा झाला त्याचीच पुनरावृत्ति झाली.' (पृ. २१७)

दास गेले होते, मोतीलालजी नेहरूरिपोर्टात गुंतले होते, जवाहरलालांना गांधींनी काँग्रेसमध्ये अध्यक्षपदाकडे आणणे सुरू केले होते त्याच सुमारास —

'सर्व मुसलमानांना एकत्र आणण्यासाठी जीनांनी १४ मागण्यांचा जाहीरनामा तयार केला. मुस्लीम लीगचे अधिवेशन ३० मार्च १९२९ ला बोलावले. डॉ. अन्सारी, डॉ. सय्यद महमूद वगैरेंनी मागण्यांना विरोध केला. तथापि मौ. महंमद अलींनी मनापासून पाठिंबा दिला. खिलाफत चलवळीच्या बरोबर उलटी परिस्थिति निर्माण झाली होती. त्यावेळी गांधी अलिबंधू युतीने जीनांना काँग्रेस अधिवेशनातून पळ काढायला लावला होता. आता गांधींच्या विरोधात जीना व महंमद अली एकत्र आले होते. काळ सूड उगवतो, त्याचे हे उदाहरण !' (पृ. २७)

'तरीही गांधींनी १९३४ च्या मुंबई अधिवेशनात काँग्रेस अध्यक्षाला कार्यकारिणीवरील १४ सदस्यांची निवड करण्याचा अधिकार मान्य करवून घेतला. म्हणजे कार्यकारिणी काँग्रेसच्या अध्यक्षाच्या ताब्यात तर अध्यक्ष गांधींच्या ताब्यात अशा तऱ्हेने गांधींनी निवृत्त होऊनही काँग्रेसवर आपली प्रभुसत्ता स्थापन केली.' (पृ. ३५१)

म्हणजेच राजकारण सुटत नव्हते वरकरणीच काँग्रेस सोडले.

'गांधींनी 'हिंदस्वराज'मध्ये पार्लमेंटला वेश्या म्हटले होते व त्याच पार्लमेंटशी नाते सांगणाऱ्या

असेंब्ली निवडणुकांमध्ये काँग्रेसमधून निवृत्त झाल्यानंतरही एवढा रस घ्यावा यामागे काय रहस्य होते त्याचा उलगडा गांधीवादी विचारवंत करतील काय? निर्मोही गांधींना राजकारणाचा मोह सुटत नव्हता हेच त्याचे कारण असेल काय?' (पृ. ३५९)

पुढे हरिपुरा सुभाष, डॉ. खरे, भुलाभाई देसाई प्रकरणे आहेतच.

'गांधी स्वत:ही इतरांना डोईजड होऊनच काँग्रेसचे एकमेवाद्वितीय पुढारी झाले होते. पण मुस्लीमलीगचे नेते म्हणून डोईजड होण्यापेक्षा काँग्रसचे पुढारी म्हणून डाईजड झालेले जीना देशाला आणि काँग्रेसला अधिक परवडणारे होते हा विवेक गांधींना सुचला नाही.' (पृ. ३६९)

नेमका हा विवेक टिळकांजवळ होता!

'काँग्रेसला स्वराज्य जर हवे असले, तर मुसलमानांबरोबर समझोता करून ब्रिटिशांना हिंदुस्थानच्या मागण्या मान्य करायला लावून युद्धप्रयत्नात सहभागी होणे एवढा एकच सुज्ञपणाचा मार्ग काँग्रेसला उपलब्ध होता; पण त्यासाठी मुत्सद्देगिरीची जरूर होती, महात्म्याची नव्हती. दोघांबरोबर विरोधाचे धोरण स्वीकारले व अखेरीस राजकारणाशी काडीमात्र संबंध नसलेल्यांना त्याची जबरदस्त किंमत चुकवावी लागली.' (पृ. ४९)

आणि हे दुर्दैवी भाकित —

'A stage may be reached when direct action may become the necessary prelude to constituent assembly.' गांधी २५-११-३९. (पृ. ४२३)

झाले भलतेच मुस्लीम लीगची direct action स्वराज्यापूर्वीच फाळणीची नांदी ठरली नव्हे अखण्ड भारताची मृत्यूघंटा ठरली.

'मागे वळून पाहता एखाद्या कड्यावरील निसरड्या वाटेचे काँग्रेसचे राजकारण चाललेले दिसते आणि त्यावरून अखेर पाय घसरून अटळ अशा विनाशाकडे काँग्रेस आणि लीग, यांनी देशाला नेले. एखाद्या ठिकाणी पाय रोवून निश्चित भूमिका घेण्याची काँग्रेसची तयारी नव्हती.' (पृ. ४३६)

प्रा. सारथींनी ह्या साऱ्या उलथापालथी जणू भरतवाक्य वाटावे असे लिहिले आहे — 'जोपर्यंत जीना हे हिंदुमुस्लिम ऐक्याचे पुरस्कर्ते होते तोपर्यंत गांधींनी जीनावर कुरघोडी केली, पण जीनांनी हिंदुमुस्लीम ऐक्याचा नाद सोडून जातीयवादी राजकारणाला सुरुवात केल्यानंतर मात्र गांधी सतत पराभूत होत गेले. विचारवंतांनी या सूत्राचे विवरण करणे आवश्यक आहे. या विचित्र संबंधाची परिणती अखेर फाळणी आणि भयानक रक्तपात यात झाली हा भाग सर्वोच्च महत्वाचा आहे.' (पृ. ४६४)

ह्यापुढील शंभर एक पृष्ठात 'कॅबिनेट मिशन योजना', 'वंश विच्छेद', 'रक्तमय क्रांती (फाळणी)', 'भ्रमनिरास आणि निर्वाण' अशी प्रकरणे आहेत. तो सगळा इतिहास त्यामानाने ताजा आणि दुर्दैवी असल्याने वाचकांनी केवळ सारभूत विवेचनासाठी वाटला तर वाचावा. प्रा. सारथींशी ते समरस होतील.

चौरीचुरा प्रकरणी अहिंसा व्यावहारिक आंदोलनावर मात करते.



अनुक्रमणिका

खिलाफत, असहकार प्रकरणी हिंसा सत्यावर व जातीय ऐक्यावर मात करते.

गांधी महमदअली जीनांवर मात करतात ती उलटवून पुढे जीनामहंमदअली गांधींवर मात करतात.

असहकारानंतर स्वराज्य पार्टीचे राजकारण जणू अस्तंगत होते तर थोड्याशा काळाकरता काँग्रेस मंत्रिमंडळात भाग घेते — सोडून देते.

आश्रमाचे विधायक स्वरूप सत्याग्रह नाहीसे करतो. तर सत्याग्रहातील आग्रहाचे स्वरूप राजकारण नाहीसे करते.

भारत छोडो सांगणारे नेते व्हाअिसरॉयला मार्गदर्शनाची आठवण करतात.

ऐन वणव्यात गांधींचे ब्रह्मचर्य प्रेम उफाळून येते तर नेहरू-पटेल-कृपलानी-आझाद गांधींना सत्याग्रह निर्णयात एकटे पाडतात आणि 'एकला चलो रे' गांधीजींच्या नशिबी येते.

One man army चे महात्माजी १९४८ मध्ये हिंदूंवर उपोषणाचे दडपण आणतात आणि शांततेच्या आवरणाखाली ज्वालामुखीचा स्फोट होतो.

आपल्या मूल्यांचा ऱ्हास गांधींना पहावा लागतो. काँग्रेसचे विसर्जन ते सुचवतात पण — व्यक्तिनिष्ठ काँग्रेस-नेहरू, इंदिरा, राजीव, सोनिया यांमधून जिवंत राहते — गांधीवाद मृतवत् होतो. Civil disobedience let to civil war in 1947 आणि आता God forbid it अराजकाकडे?

एक मोठा प्रश्न मला नेहमी पडतो की इतके वेळा उपोषणे करणाऱ्या गांधींनी 'फाळणी' नको म्हणून उपोषण अगदी आमरण उपोषण का केले नाही? 'देहाच्या फाळणीनंतर देशाची फाळणी होईल' हे त्यांचेच बोल केवळ बुडबुडे का ठरले? कां गांधी मृत्यूपूर्वीच आपल्या सार्वजनिक जीवनाचे मरण अनुभवून बसलेले महात्मा होते? असो.

मला खण्ड २ च्या प्रारंभीचे म. गांधीचे वाक्य —

'The cause of liberty becomes a mochry if the price to be paid is wholeside destruction of those who are to enjoy liberty' व

प्रा. सारथींची

'ज्यांना स्वातंत्र्याचा अर्थही समजला नसेल अशा लक्षावधी निरपराध स्त्री पुरुषांची कत्तल स्वातंत्र्याच्या उताविळीने झाली त्यांच्या स्मृतीस' — दुसऱ्या खंडाची अर्पणपत्रिका.

दोन्ही हृदयातील फाळणीची जखम पुन्हा भळभळा वाहवणाऱ्या ठरल्या!

इत्यलम: □

*शोध महात्मा गांधींचा खंड १, पृष्ठसंख्या ५२८, मूल्य रु. ३५०*

*शोध महात्मा गांधींचा खंड २, पृष्ठसंख्या ५७२, मूल्य रु. ३५०*

अस्मिता प्रकाशन, ४५८/२, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३० फोन ५३३५९७, ५३९९९२

□

श्री. म. जोशी

३३/८, एरंडवणा, पुणे ४



अनुक्रमणिका

## म. गांधींजींवरील निवडक पुस्तकांची सूची

- म. गांधी चरित्र खण्ड २-८ टाअिम्स ऑफ इंडिया
- म. गांधी चरित्र (इंग्रजी) मराठी — दा.न. शिखरे १९४४-सकाळ प्रकाशन
- Last phase - Vii, II- Pyarelal -Time of India
- Life of Mahatma Gandhi -Kripalani
- Autobiography Vol. I,II -Dr. M.R.Jaykar-Asia Pathica
- Complete Work of Mahatma Gandhi. Vol.I-vol.II in jacket (Navjivan Trust )
- Selected works of Mahatma Gandhi Vol.I-vol.II in jacket-Navjivan Trust )
- गांधी गोंधळ — स्वा. सावरकर (श्रद्धानंद मधील लेख)
- Gandhi Philosophy Xrayes ch. I,II (Nathuram Godse (May it please your heman)
- अस्वीकृतींमे उठा हाथ — आचार्य रजनीश-रजनीश फौंडेशन
- भारत, गांधी और मैं — आचार्य रजनीश-पॉकेट बुक
- Ranade-Gandhi-Jinnah - Dr. Ambedkar (vol I-Govt. of Maharashtra pub.)
- What Congress has done to unfomahable (Dr. Ambedkar
- Critique of Gandhi - M.M. Kothari-Critique Pub. Jodhpur
- गांधी-मानव आणि महामानव — द.न. गोखले-मौज प्रकाशन
- नौराजी ते नेहरू — गोविंद तळवळकर-मॅजेस्टिक
- Curgon to Nehru (Durgadas)
- Gandhi-A murderer of Gandhi { Dr. Rao Hyderabad)
- Gandhi-Biography { Dhananjay Keer-Popular)
- यांनी इतिहास घडविला — धनंजय कीर
- ग्रह आणि तारे - सत्यग्राही — देशमुख आणि कं. पुणे
- गांधी विचारदर्शन — २० पुस्तके-गांधी वाङ्मय प्रकाशन समिती, पुणे १९६३
- A week with Gandhi (Lours Fischer)
- Pen Portraits Tributs by Gandhi (NBT)
- The new India of my dreams - Bhartiya Vidya Bhavan
- Gandhi-repraisal by B.R. Nanda.
- गांधी आणि गांधीवाद - डॉ. पट्टाभिसीतारामय्या, अनुवाद-गं. भा. निरंतर (देशमुख आणि कं., पुणे, १९४६
- Taj a Freedom movement-Taj group magazine First Quarter 1998
- Yerwada magazine lettters of Gandhi-(Navjivan Trust)
- Days with Gandhi - Mirmaldas Bose

- गांधी आणि सावरकर-बाळाराव सावरकर
- Gita as remuneration by Gandhi & Manubhai Desai-Navjivan Trust
- सत्याचे प्रयोज-नवजीवन ट्रस्ट
- गांधीजी-पु. ल. देशपांडे (चित्रे-आचरेकर)
- Delhi Diary (Prayers etc.) Navjivan Trust
- Gandhi (Eminent Person series) - G. Natshan (Madras)
- गांधीवाद - सरकारी बनाम मढी- डॉ. लोहिया - प्रिन्टेक्स्ट प्रकाशन
- यात्रा - डॉ. लोहिया
- जनगणमन- डॉ. लोहिया
- Gandhi Muslim Conspiary - Ghanekar
- गांधी, काँग्रेस व फाळणी - देवीचंद झा (श्रीविद्या प्रकाशन)

---

## स्वागत

- **घागर :** सुषमा केसकर, श्री विद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे ५४
- **व्यक्ति :** य. दि. फडके, श्री विद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे १८८
- **याला जीवन ऐसे नाव :** जयंत नारळीकर, श्री विद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे १५४
- **काळे ढग विरले :** के. एस्. कुलकर्णी, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे १२९
- **श्री ज्ञानदेव विरचित अथ श्री स्वात्मानुभव :** संपादक डॉ. वि.य. कुलकर्णी, इंद्रायणी प्रकाशन, पुणे, पृष्ठे ६२

**साकेत प्रकाशन, औरंगाबाद यांची प्रकाशने**

- **क्रीडा वैद्यकशास्त्र :** डॉ. वि. गं. पाठक, पृष्ठे १३२
- **शरीरविज्ञान व क्रीडातंत्र शास्त्र :** डॉ. वि. गं. पाठक, पृष्ठे ११५
- **स्वास्थ्य संवाद :** डॉ. सुहास जेवळीकर, पृष्ठे १२०
- **शेळीपालन व्यवसाय मार्गदर्शिका :** डॉ. दादासाहेब कोरटकर, पृष्ठे १८२
- **निबंध लेखनाचा अभ्यास :** स. ध. झांबरे, पृष्ठे १३६
- **जीवनगान :** शं. व्यं. कश्यपे, पृष्ठे ७२
- **चित्रगाणी :** प्र. द. जोशी, पृष्ठे १६
- **चिव चिव चिमणी :** शंकर बोईनवाड, पृष्ठे ३२
- **चंदर :** अरुण वि. देशपांडे, पृष्ठे ५६
- **इंग्रजीचे अध्यापन नवीन दृष्टिकोनातून :** इयत्ता ५ वी, ६ वी, ७ वी, ८वी, लेखक - दिवाकर वेल्हाळ, पृष्ठे अनु. ४६, ४८, ४६, ४०
- **काही सांगावेसे वाटते :** सुहास नाईक, अपर्णा प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ७८
- **स्त्रीनक्षत्र :** सौ. विजया जहागीरदार, दिलीपराज प्रकाशन, पुणे, पृष्ठे ७८
- **थवे चातकांचे :** शैलेंद्र टकारिया, किर्ती प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ४२

# 'कवी वसंत बापट : चिकित्सक अभ्यास'

बाळासाहेब गुंजाळ

मा. वसंत बापट हे स्वातंत्र्योत्तर कालखंडातील रसिकमान्य कवी आहेत, लेखक आहेत. त्यांनी काव्यलेखनाबरोबर गद्यलेखनही केले असले तरी साहित्यक्षेत्रातील बापटांची ओळख कवी म्हणूनच आहे. काव्य, गद्यसाहित्य आणि बालसाहित्य या वाङ्मयप्रकारातून त्यांनी विपुल लेखन केले आहे. हयात असलेल्या आणि प्रामुख्याने लेखन चालू असलेल्या साहित्यिकाच्या अभ्यासाबाबत काही मर्यादा निश्चित करणे आवश्यक असते. बापटांचे लेखन अद्यापही चालू असल्याने त्यांच्या प्रारंभीच्या 'बिजली' या साहित्यकृतीपासून ऑक्टोबर १९८९पर्यंत पुस्तकरूपाने प्रकाशित झालेल्या साहित्यकृतींचा अभ्यास करणे ही मर्यादा मी आखून घेतली आहे. १९८९ नंतर पुस्तकरूपाने प्रकाशित झालेल्या साहित्यकृतींचा आणि पुस्तकरूपाने प्रकाशित न झालेल्या साहित्याचा प्रस्तुत प्रबंधात मी विचार केलेला नाही. स्वातंत्र्योत्तर कालखंडातील एक रसिकमान्य कवी, प्रतिभावंत साहित्यिक म्हणून वसंत बापटांच्या समग्र साहित्याचा मी अभ्यास केला आहे.

वसंत बापटांच्या जीवनासंदर्भात काही गौरवपर लेख आणि त्रोटक पण विखुरलेल्या स्वरूपात साहित्याची समीक्षा आढळत असली, तरी त्यांच्या समग्र साहित्याचा अभ्यास प्रबंधरूपाने वा ग्रंथरूपाने झालेला दिसत नाही. त्यामुळे त्यांच्या समग्र साहित्याचा अभ्यास व्हावा, या भूमिकेने प्रस्तुत विषय निवडला आहे. वसंत बापटांचे काव्यकर्तृत्वदर्शन आणि व्यक्तिमत्त्वदर्शन हा माझ्या प्रबंधाचा उद्देश आहे. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या आणि साहित्यनिर्मितीच्या प्रेरणांचा शोध घेणे हा माझ्या अभ्यासाचा हेतू आहे. त्यासाठी वसंत बापटांच्या साहित्याचे आकलन-आस्वादन करणे ही माझी या अभ्यासामागील एक दृष्टी आहे. प्रस्तुत प्रबंधाची मांडणी आठ प्रकरणात केली आहे. ती पुढीलप्रमाणे —

प्रबंधाची रूपरेषा

१) कवी वसंत बापट : बहुलक्षी व्यक्तिमत्त्व
२) वसंत बापटांची कविता
३) वसंत बापटांची कविता:आशयदर्शन
४) वसंत बापटांचे गद्यसाहित्य
५) वसंत बापटांचे बालसाहित्य
६) वसंत बापटांचे भाषासौंदर्य
७) वसंत बापटांचा जीवनविषयक दृष्टिकोन
८) समारोप

पहिल्या प्रकरणात वसंत बापटांच्या व्यक्तिमत्त्वाचा शोध घेण्याचा प्रयत्न आहे. त्यासाठी (अ) वसंत बापटांचे चरित्र आणि व्यक्तिमत्त्वाची जडणघडण आणि (आ) वसंत बापटांच्या व्यक्तिमत्त्वाचे विविध पैलू, असे दोन उपविभाग केले आहेत. पहिल्या



अनुक्रमणिका

**प्रा. वसंत बापट :**

**परिचय :**

जन्म-कऱ्हाड (जि. सातारा), २५ जुलै १९२२
शिक्षण-पुणे. नू.म.वि. आणि स.प. कॉलेज.
बी.ए., १९४६, एम.ए. १९४८.

- स्वातंत्र्य आंदोलन-१९४२ च्या भारत छोडो आंदोलनात सहभाग.
- ऑगस्ट १९४३ ते जानेवारी १९४५ पर्यंत कारावास.
- व्यवसाय-संस्कृत व मराठीचे प्राध्यापक (१९४८ ते १९७४)
- मुंबई विद्यापीठात गुरुदेव टागोर तौलनिक साहित्याचे प्राध्यापक : १९७४ ते १९८२
- मुंबई विद्यापीठात संशोधन-मार्गदर्शक
- साधना साप्ताहिकाचे संपादक-१९८३ ते १९९८ पर्यंत

**राष्ट्रसेवादलाचे कार्य :**

- राष्ट्रसेवादलात स्थापनेपासून सहभाग, विशेषत: कलापथकाचे काम १९४८ ते १९८०
- लोककलांच्या जोपासनेत आणि त्यांना नवे रूप देण्यात अग्रेसर. भोळे बगळे, सर्वकल्याण, मातीची मुले इत्यादि नृत्यनाट्याचे लेखन, दिग्दर्शन, समूहगीते आणि पोवाडे यांच्या क्षेत्रात विशेष कामगिरी.
- पु. ल. देशपांडे लिखित 'पुढारी पाहिजे', व्यंकटेश माडगूळकर लिखित 'बिनबियांचे झाड', 'कुणाचा कुणाला मेळ नाही' आणि शंकर पाटील लिखित 'गल्ली ते दिल्ली' इत्यादि लोकनाट्यात लक्षणीय भूमिका.

**प्रवास -**

संपूर्ण भारत : १९६३-६४. युरोप : १९६९
अमेरिका : १९७७. मॉरिशस : १९९१
आखाती देश : १९९२. कॅनडा आणि अमेरिका : १९९३.
ऑस्ट्रेलिया-न्यूझीलंड : १९९४.

**कवितासंग्रह -**

बिजली १९५२, सेतु १९५७
अकरावी दिशा १९६२, सकीना १९७२,
मानसी १९७७
प्रवासाच्या कविता १९८२,
शिंग फुंकिले रणी १९८४
शूर मर्दाचा पोवाडा १९८८,
मेघहदय १९८८, तेजसी १९९१
राजसी १९९१, रसिया १९९३.

**बालकविता -**

चंगामंगा १९८३, अवडक तवडक १९८३
आम्ही १९८५, गरगर गिरकी १९९२
फिरकी १९९२, फुलराणीच्या कविता १९९२.

**बालनाट्य** - बालगोविंद १९६५

**बाल नृत्यनाट्य** - परीच्या राज्यात १९९४

**प्रवासचित्रे** - बारा गावचं पाणी १९६६
अहा, देश कसा छान १९६६,
गोष्टी देशांतरीच्या १९९६

**व्यक्तिदर्शन** - जिंकुनि मरणाला १९८१

**समीक्षा** - तौलनिक साहित्याभ्यास १९८०

**संपादित** - आजची मराठी कविता १९८४

**राजकीय उपहास** - विसाजीपंताची बखर १९८९

'सुंदरा मनामध्ये भरली' या लावणी परंपरेवर आधारित संगीतनृत्यमय खेळाची संहिता.
मेघहदय, तौलनिक साहित्याभ्यास या पुस्तकांचे तसेच अनेक कवितांचे अनुवाद गुजराती, हिंदी, इंग्रजी भाषांत.
'वसंत बापट : निवडक कविता'चे गुजराती रूपांतर वसंत जोशी, प्रकाशक : उमाशंकर जोषी.
अखिल भारतीय गुजराती साहित्य संमेलनाचे उद्‌घाटक (गुजरातीतून भाषण)
१९९९ च्या अ.भा.मा.सा. संमेलनाचे अध्यक्ष



अनुक्रमणिका

उपविभागात त्यांचे बालपण, शिक्षण, व्यवसाय, प्रेमविवाह, स्वातंत्र्य आंदोलनातील सहभाग व तुरुंगवास, पंढरपूर मुक्ती आंदोलनात सहभाग, गोवामुक्ती लढा, संयुक्त महाराष्ट्राचा लढा, भू-दान चळवळ, आणीबाणी यासारख्या चळवळीतील योगदान, राष्ट्रसेवादल व कलापथकातील योगदान, थोरामोठ्यांचे संस्कार-सहवास व प्रेम, मिळालेले मानसन्मान, भारतयात्रा व परदेश प्रवास, लेखनाची पहिली पावले, वाङ्मयीन वातावरण व प्रभाव-यातून त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची जडणघडण कशी होत गेली याचे दर्शन घडविले आहे. दुसऱ्या उपविभागात त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या विविध पैलूंचे दर्शन घडविले आहे. त्यांचे व्यक्तिमत्त्व अनेक पैलूंनी संपन्न आहे. कवी, गद्यसाहित्यिक, बालसाहित्यिक, राष्ट्रसेवादलाचा कार्यकर्ता, रसिकमान्य कार्यक्रमांचे निर्माते, दिग्दर्शक, अभिनेता, पत्रकार, गीतकार, भाष्यकार, वक्ता, प्राध्यापक, जाहिरात लेखन, स्वातंत्र्यसैनिक, स्वातंत्र्यशाहीर-अशा अनेक अंगांनी बापटांच्या व्यक्तिमत्त्वाचे दर्शन घडते.

१९४२च्या चळवळीत उडी घेतलेल्या बापटांची राष्ट्रनिष्ठा प्रखर आहे. प्रखर राष्ट्रनिष्ठा आणि राष्ट्रप्रेमाने त्यांचे व्यक्तिमत्त्व उजळून निघाले आहे. साने गुरुजी, सेनापती बापट, एस. एम. जोशी, नानासाहेब गोरे, शिरूभाऊ लिमये, रावसाहेब पटवर्धन, भाऊसाहेब रानडे यासारख्या थोरामोठ्यांचे संस्कार, सहवास व प्रेम त्यांना मिळाले आहे. त्यांच्या सहवासात बापटांचे जीवन अधिकच समृद्ध झाले आहे. मराठी कवितेबद्दलची आवड व अभिरूची अधिक संपन्न करण्यात बापटांचा वाटा मोठा आहे. विंदा करंदीकर आणि मंगेश पाडगावकरांच्या साथीने कविता रसिकांच्या कानापर्यंतच नव्हे, मनापर्यंत पोहोचविली. महाराष्ट्रभर त्यांचे 'काव्यदर्शन'चे कार्यक्रम झाले आहेत. तमाशासारख्या लोककलेला राष्ट्रीय तमाशाचे रूप देऊन प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. मराठी माणसाचे सांस्कृतिक जीवन समृद्ध करण्यात बापटांनी विशेष रूची दाखविली आहे. कलापथकाच्या उभारणीत आणि विकासात त्यांचे योगदान अधिक आहे. ३५ वर्षे कलापथकाचे नेतृत्व करून कलापथक नावारूपाला आणले. त्यामुळे बापट हेच कलापथकाचे खरे अध्वर्यू होत, असे म्हटले पाहिजे. कलापथकाच्या इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहिली जावी अशी कामगिरी त्यांनी बजावली आहे.

वसंत बापट साहित्याचे व्यासंगी प्राध्यापक आहेत. लहानपणापासूनच संस्कृतचा वारसा त्यांना लाभला आहे. निसर्गाच्या रंगरसाचेही त्यांना खूप आकर्षण आहे. निसर्ग हीच आनंदाची गंगोत्री आहे. निसर्गसौंदर्याची अधिष्ठाने शोधावीत, बारा गावचे पाणी चाखावे आणि तेथील निसर्ग डोळ्यांत साठवून घ्यावा अशी त्यांची धडपड असते. त्यांची भटकी वृत्ती या निसर्गप्रेमातून निर्माण झालेली दिसते. त्यांचे व्यक्तिमत्त्व सौंदर्यवादी आहे. संस्कृतप्रेम आणि निसर्गप्रेम हे त्यांच्या सौंदर्यलक्षी वृत्तीचेच द्योतक आहे. 'केवळ सौंदर्य केवळ आनंद' अशा सौंदर्यवादी मनोवृत्तीतून सौंदर्यास्वाद घेण्याची त्यांची वृत्ती आहे. लहानमोठ्या साहित्य संमेलनाच्या



अनुक्रमणिका

अध्यक्षपदावरून केलेली भाषणे, साहित्यिक मेळावे आणि मुलाखतीतून त्यांनी साहित्यविषयक विचार व्यक्त केले आहेत. साहित्याचे प्रयोजन, कवीचे व्यक्तिमत्त्व, कविता म्हणजे काय?, काव्यनिर्मिती प्रक्रिया, कवितेतील सामाजिकता, ग्रामीण व दलित साहित्य, अलीकडची कविता, मराठी समीक्षा, शिक्षणाचे माध्यम, इंग्रजीचे वर्चस्व या विषयावर त्यांनी वेळोवेळी जे विचार-चिंतन केले आहे, त्यातून त्यांचे तत्त्वचिंतक व्यक्तिमत्त्व उभे राहते. बापटांच्या बहुलक्षी व्यक्तिमत्त्वाचे दर्शन या प्रकरणातून साकार करण्याचा प्रयत्न केला आहे.

दुसऱ्या प्रकरणात वसंत बापटांच्या काव्यकर्तृत्वाचा आढावा घेतलेला आहे. कालानुक्रमे काव्यप्रवास पाहताना तो विकसित होत गेला किंवा कसे याचे दर्शन घडविले आहे. १९४२च्या चळवळीच्या आणि कलापथकाच्या निमित्ताने त्यांचे काव्यलेखन सुरू झाले. तमाशा, वग, संवाद, गाणी, पोवाडे असे लेखन त्यांनी प्रारंभी केले आहे. परंतु जाणीवपूर्वक काव्यलेखन १९४६-४७पासून सुरू झाले आहे. १९४२ ची चळवळ, स्वातंत्र्यलढा, दुसरे जागतिक महायुद्ध, महायुद्धाचे भीषण आर्थिक व सामाजिक परिणाम, युद्धात झालेला अणुस्फोटाचा वापर, यंत्रयुग, गांधीजींची 'खेड्याकडे चला' ही हाक — यासारख्या घटनांचे पडसाद तत्कालिन कवितेत उमटलेले दिसतात. रविकिरण मंडळींचा दबदबा कमी होत होता आणि अनिल-बोरकर-कुसुमाग्रज-ना. घ. देशपांडे यांच्या कवितेने तरुण पिढी भारावलेली



**प्रा. डॉ. बाळासाहेब गुंजाळ**
के. टी. एच्. कॉलेज, गंगापूर रोड, नाशिक येथे प्राध्यापक.

१ जून १९५६ रोजी शेतकरी अशिक्षित कुटुंबात जन्म. महाविद्यालयीन शिक्षण सटाणा व मालेगाव येथे झाले. एम्. ए. प्रथम श्रेणीत उत्तीर्ण. तीन वर्ष प्राथमिक शाळेत शिक्षकाची नोकरी. सप्टेंबर १९८४ पासून नांदगाव, निफाड, पिंपळगाव (बसवंत), सिन्नर, के.टी.एच्.एम् कॉलेज, नाशिक येथे व्याख्याता म्हणून मराठी विषयाचे अध्यापन. सिन्नर, नाशिक, येथे पाच वर्षापासून पदव्युत्तर वर्गाचे अध्यापन.

एम्. फिल — 'कवी वसंत बापटांच्या प्रकाशित काव्यसंग्रहांचा अभ्यास' या विषयावर मार्च १९८९ मध्ये पुणे विद्यापीठाची 'अ' श्रेणीत पदवी संपादन. पीएच्.डी. — 'कवी वसंत बापट यांच्या व्यक्तिमत्त्वाचा आणि साहित्यनिर्मितीचा चिकित्सक अभ्यास'— पुणे विद्यापीठ, जून १९९६.
मार्गदर्शक - डॉ. प्र. भ. राजगुरु, नाशिक

'अनुबंध' व 'कविताआरती' या नियतकालिकात लेख प्रसिद्ध होत आहेत. व्यक्तिलेख प्रसिद्ध. अनेक चर्चासत्रात निबंधलेखन व वाचन. बापटांच्या साहित्यावर पुस्तक प्रकाशित करण्याचा मानस.



अनुक्रमणिका

होती. मर्ढेकरांची नवकवितेची धाराही त्याकाळी प्रभावशाली होती. अशा धामधुमीच्या काळात बापटांचे काव्यलेखन सुरू झाले. त्यांच्या काव्यप्रतिभेचा पहिला अविष्कार 'बिजली'च्या रूपाने झाला. त्यांचे 'बिजली' (१९५२), 'सेतु'(१९५७), 'अकरावी दिशा' (१९६२), 'सकीना' (१९७२), 'मानसी' (१९७७), 'प्रवासाच्या कविता' (१९८२), 'शिंग फुंकिले रणी' (१९८२), 'शूर मर्दाचा पोवाडा' (१९८८), 'मेघहृदय' (१९८८), असे एकूण ९ काव्यसंग्रह प्रकाशित झाले आहेत. (अलीकडे त्यांचे 'तेजसी' (१९९१), 'राजसी' (१९९१) आणि 'रसिया' (१९९३) हे संग्रह प्रकाशित झाले असले तरी प्रस्तुत प्रबंधात त्यांचा समावेश केलेला नाही.)

बापटांची प्रारंभीची कविता सामाजिक-राष्ट्रीय जाणीवेची आहे. 'जनजागरण' हे तिचे एक प्रयोजन आहे. तिचे स्वरूप काहीसे प्रचारात्मक आहे. ती प्रचारकी असली तरी त्यामागील भावनिक जिव्हाळा महत्त्वाचा आहे. गांधीजींच्या विचारसरणीने ती भारावलेली आहे. प्रचारात्मक पातळीवरून ती विकसित झालेली आहे. समकालीन सामाजिक वास्तव प्रखरपणे 'बिजली'त अविष्कृत झाले आहे. 'बिजली'तील क्रांतीवाद भाबडा असला तरी मनापासूनचा आहे. भावनिक जिव्हाळा आणि आंतरिक निष्ठेमुळे त्यांची प्रारंभीची कविताही उत्कट वाटते. 'बिजली'नंतर 'सेतु'मधील कविता विकसित झाली आहे ती आत्मलक्षी स्वरूपाची झाली. आत्मलक्षी झाल्यापासून ती शृंगारप्रधान बनली आणि तिचा साज शाहिरी लावणीसारखा दिसू लागला. निसर्ग आणि प्रीती या जाणिवांची मनोहर रूपे 'सेतू'त पाहवयास मिळतात. प्रीतीभावना व्यक्त करण्यासाठी त्यांनी निसर्गाची मदत घेतली आहे. 'अकरावी दिशा' आणि 'सकीना'त ती स्थिर झाली आहे. त्यांच्या एकूण काव्यप्रवासात 'मानसी' हे अधिक विकसित रूप आहे. 'मानसी'त बापट अधिक अंतर्मुख झाले आहेत. 'प्रवासाच्या कविता', 'शिंग फुंकिले रणी,' 'शूर मर्दाचा पोवाडा' आणि 'मेघहृदय' मधील त्यांच्या अभिव्यक्तीची रूपे वेगवेगळी आहेत. त्या त्या काव्यसंग्रहातून त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचेही वेगळे रूपदर्शन घडते. 'प्रवासाच्या कविता' हे अमेरिकेतील प्रवासाचे प्रवासपद्य आहे. 'शिंग फुंकिले रणी' आणि 'शूर मर्दाचा पोवाडा' या संग्रहातील राष्ट्रीय गीते व पोवाडे यांचा कालपट व्यापक आहे. मराठी मनाला स्वाभिमानाची, राष्ट्रवादाची, देशभक्तीची प्रेरणा त्यांच्या राष्ट्रीय गीतांनी आणि पोवाड्यांनी दिली आहे. 'मेघहृदय' हे कविकुलगुरू कालिदासाच्या 'मेघदूता'चे अंतरंगदर्शन असले तरी त्यांच्या प्रतिभेचे सामर्थ्य नजरेत भरते.

तिसऱ्या प्रकरणात वसंत बापटांच्या कवितांचे आशयाच्या अंगाने आशयदर्शन घडविले आहे. त्यांची प्रतिभा विविध अंगांनी अविष्कृत झाली आहे. सामाजिक कविता, राष्ट्रीय कविता, राष्ट्रीय गीते, पोवाडे, प्रेमकविता, निसर्गकविता, लावणी अशा विविध अंगांनी त्यांचा काव्यप्रवास फुलला आहे, बहरला आहे. सामाजिक आणि राष्ट्रीय जाणीव प्रारंभापासूनच त्यांच्या



अनुक्रमणिका

कवितेत दिसते. त्यांची सामाजिक जाणीव ठसठशीतपणे अविष्कृत झालेली असली तरी तिला चिंतनशीलतेची जोड नाही. त्यांची सामाजिक कविता आवाहक आहे. भाबडी आहे. प्रासंगिक विचारदर्शन, भावदर्शन असे तिचे स्वरूप असले तरी उत्कट भावनांचे प्रकटीकरण तिच्यात आहे. त्यांची राष्ट्रीय जाणीवेची कविता प्रभावी असली तरी अनेकदा सामाजिक रूप घेऊनच ती अवतरते. या दोन्ही जाणिवांचा सरमिसळ त्यांच्या कवितेत झालेली पाहवयास मिळते. वीर विभूतीपूजनाची प्रवृत्ती बापटांच्या ठिकाणी अधिक प्रबळ आहे. देशभक्ती, राष्ट्रनिष्ठा, राष्ट्रप्रेम या भावना लोकमानसापर्यंत पोहोचविण्याच्या हेतूने त्यांनी पोवाडे लिहिले आहेत. हुतात्म्यांच्या शौर्याचा आणि त्यागाचा पूजाभावच त्यांच्या पोवाड्यातून प्रकट झालेला आहे. सामाजिक, राष्ट्रीय जाणिवेच्या कवितेतून आणि पोवाड्यातून ते तत्कालिन सामाजिक आणि राजकीय जीवनाशी एकरूप झालेले दिसतात.

वसंत बापट हे मूलतः प्रेमकवीच आहेत. प्रेम हाच त्यांच्या काव्याचा मध्यवर्ती विषय आहे. प्रेमविषयक अनुभूती व्यक्त करणे ही त्यांच्या काव्याची एक प्रमुख प्रेरणा आहे. त्यांची कविता प्रेमभावनेच्या अविष्कारात मनमोकळा शृंगार प्रकट करते. त्यांच्या एकूण कवितेत प्रेमकवी म्हणूनच त्यांची प्रतिमा ठळकपणे उठून दिसते. त्यांची प्रेमकविता प्रामुख्याने पुरुषी आहे. 'स्त्री आकर्षण' हा तिचा महत्त्वाचा गाभा आहे. निसर्गप्रतिमातून प्रेमभावना व्यक्त करणे हा तिचा विशेष आहे. हळव्या प्रीतीपासून देहमीलनापर्यंतच्या विविध छटांचे दर्शन त्यांनी घडविले आहे. लावणी हे त्यांच्या सौंदर्यलक्षी व्यक्तिमत्त्वाचे एक खास वैशिष्ट आहे. लोककलांच्या अंगाने ती विकसित झाली असली तरी 'काव्यदर्शना'त हमखास दाद मिळावी ही प्रेरणाही त्यांच्या लावणीच्या निर्मितीमागे असावी, असे वाटते. त्यांची लावणी शृंगारिक आहे, नखरेल आहे, मनोरंजनात्मक आहे. लावणीतील प्रेमभावना प्रामुख्याने पुरुषी आहे. स्त्रीसौंदर्याची अभिलाषा तिच्यातून व्यक्त झाली आहे. गेयता, नादमयता, श्रुतिमधुरता, मनमोकळी शृंगारभावना हे तिचे काही विशेष आहेत. त्यांच्या एकूणच प्रेमकवितेतील स्त्रीची प्रतिमा शरीरिणी अशीच आहे. निसर्ग हा त्यांच्या प्रेमाचा साथीदार आहे. प्रेम आणि निसर्ग या दोन्ही जाणिवांची सरमिसळ त्यांच्या कवितेत झालेली आहे. त्यांच्या कवितेतील निसर्ग हा पारंपारिक निसर्गापेक्षा वेगळा आहे. मराठी कवितेतील निसर्ग चित्रणापेक्षा त्यांनी रेखाटलेली निसर्गाची रूपे वेगळी आहेत. बापटांच्या एकूण कवितेत विविध जाणिवा आविष्कृत होत असल्या तरी प्रेमभावना आणि त्यातील विविध स्तरांचे भावपूर्ण आणि सौंदर्यपूर्ण दर्शन हाच घटक सतत आढळणारा आणि अधिक प्रभावी वाटतो. या प्रकरणात बापटांच्या एकूण काव्यरचनेचे आशयदृष्ट्या वर्गीकरण केले आहे व त्यातील विविध घटक सारखेच प्रभावी वाटतात काय याचा विचार केला आहे आणि वर्गीकरणानंतर त्या आशय घटकांचे विश्लेषण करून काढलेले निष्कर्ष अखेरीस नोंदवले आहेत.



अनुक्रमणिका

चौथ्या प्रकरणात बापटांच्या गद्यसाहित्याचा परामर्श घेतलेला आहे. त्यांनी अनुभवाच्या आणि अविष्काराच्या नव्या वाटा चोखाळण्याचा सतत प्रयत्न केला आहे. बापटांनी काव्याप्रमाणेच गद्यलेखन केले असले तरी त्यांचा पिंड हा मुळातच कवीचा आहे. त्यांच्या व्यक्तित्त्वात पद्यलेखन आणि गद्यलेखन या दोन्ही प्रवाहांचा सुरेख संगम झालेला असला तरी कवितेच्या तुलनेत गद्यलेखन दुय्यम वाटते. 'बारा गावचं पाणी', 'जिंकुनि मरणाला', 'विसाजीपंताची वीस कलमी बखर,' 'तौलनिक साहित्याभ्यास: मूलतत्त्वे आणि दिशा' ही पुस्तके त्यांच्या गद्यलेखनाची साक्ष देतात. त्यांच्या गद्यसाहित्यनिर्मितीची प्रेरणा, गद्यसाहित्याचे विशेष आणि त्यातून बापटांच्या व्यक्तिमत्त्वाचे घडणारे दर्शन, याचा शोध ह्या प्रकरणात घेतला आहे. सौंदर्यलक्षी व्यक्तिमत्त्व हाच घटक गद्यलेखनातही प्रामुख्याने आढळतो.

पाचव्या प्रकरणात बापटांच्या बालसाहित्याचा परामर्श घेतलेला आहे. त्यांच्या बालसाहित्याच्या अभ्यासात 'अवडक तवडक', 'चंगामंगा' आणि 'आम्ही' हे तीन बालकविता संग्रह आणि 'बालगोविंद' या बालनाट्याचा अंतर्भाव आहे. बालमनाशी, बालभावनेची एकरूप होण्याच्या वृत्तीतून बालसाहित्याचा जन्म होतो. बापटांची वृत्ती बालमनाशी, बालभावनेशी समरस होणारी आहे. त्यांनी आपले शैशव जपले आहे. त्यांच्या व्यक्तित्त्वात एक लहान मूल दडलेले आहे. स्वत:मधील प्रौढपणाला विसरून त्यांनी स्वत:मधील मूलपणाला साद घातली आहे. बालमनाशी 'आनंदाने गाऊ या, आनंदाने नाचू या' या भूमिकेतून त्यांनी बालसाहित्य लिहिले आहे. नाचवणारी नाचरी लय आणि ताल यांनी नटलेले त्यांचे बालसाहित्य भावपोषण करणारे आहे.

सहाव्या प्रकरणात वसंत बापटांच्या भाषासौंदर्याचा परामर्श घेतलेला आहे. त्यांच्या एकूण साहित्यप्रवासात भाषाशैली हा घटकही विशेष नजरेत भरतो. त्यामुळे काव्यशैली, गद्यशैली आणि बालसाहित्याच्या भाषाशैलीचा सौंदर्यशोध घेतला आहे. नादमाधुर्य, लयबद्धता, गेयता, छंदप्रभुत्त्व, अलंकारप्रभुत्त्व, नाट्यमयता, उपहास-उपरोध, संस्कृत आणि अरवी-फार्सी शब्दकळा, प्रतिमासृष्टी, आवेश, शाहिरी ढंग- हे त्यांच्या शैलीचे विशेष, लक्ष वेधून घेतात. त्यांची कविता काहीशी शब्दवेडी व नादलुब्ध आहे. छंद-लय-ताल रसिकमनाला डोलावणारी आहे. शृंगाररस आणि वीररस हे त्यांच्या काव्याचे दोन प्रमुख रस आहे. उपरोध-उपहास हा त्यांच्या साहित्याचा एक विशेष आहे.

सातव्या प्रकरणात वसंत बापटांचा जीवनविषयक दृष्टिकोन विचारात घेतला आहे. कोणत्याही साहित्यिकाजवळ साहित्यविषयक आणि जीवनविषयक असा एक दृष्टिकोन असतोच. जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन त्यांच्या साहित्यातही परावर्तित झालेला दिसतो. 'केवळ सौंदर्य केवळ आनंद' हे त्यांचे जीवनविषयक तत्त्वज्ञान आहे. त्यांचा जीवनविषयक दृष्टिकोन सौंदर्यासक्त आहे, आस्वादक आहे. सौंदर्यशोध घेण्याची वृत्ती त्यांच्या

व्यक्तित्त्वात अधिक आहे. त्यांची जीवनदृष्टी आशावादी आहे, ध्येयवादी आहे. बापट सौंदर्यपूजक आहेत, पण समग्र जीवनाचा चिंतनशील पातळीवर विचार करणारे बापट क्वचितच आढळतात, असे मला जाणवले आहे.

समारोपाच्या आठव्या प्रकरणात वसंत बापटांच्या साहित्याचे मूल्यमापन केलेले आहे. प्रबंधात केलेल्या विवेचनाचा थोडक्यात आढावा घेऊन काही निष्कर्ष सादर केले आहेत. त्यांच्या समग्र साहित्याचे मूल्यमापन करताना त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे विविध अंगांनी घडणारे दर्शन, साहित्यनिर्मितीच्या तत्त्वज्ञान, गद्यसाहित्य आणि बालसाहित्य, भाषाशैली, काव्यदर्शन, कलापथक, स्वातंत्र्यपूर्ण आणि स्वातंत्र्योत्तर काळातील परिवर्तनाचा संवेदनशील साक्षीदार — अशा अंगांनी त्यांच्या साहित्याचा आढावा घेतला आहे. बापटांच्या एकूण साहित्य प्रवासात सौंदर्यलक्षी मन हाच घटक सातत्याने जाणवतो. आणि त्यांचा एकूण लेखनाचा विचार केला तर 'कवितारती' हीच ठळकपणे लक्षवेधी ठरते. अशा प्रकारे बापटांच्या समग्र साहित्याचा आढावा घेताना शेवटी शिल्लक राहणारे बापट 'कवी' म्हणूनच स्मरणात राहतात, हे विसरता येत नाही.

□

प्रा. डॉ. बाळासाहेब गुंजाळ
साईउद्यान अपार्टमेंटस्, मंगलनगर,
गंगापूर रोड, नाशिक २.
दूरध्वनी : ३१३१४२

---

## स्वागत

- **श्री संत चोखामेळा चरित्र व अभंग :** संपा. स.भा. कदम, पृष्ठे १४४
- **डॉक्टरकी :** डॉ. नरेंद्र जोशी, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे १३५
- **डॉ. आंबेडकरांचे सामाजिक धोरण-एक अभ्यास :** शेषराव मोरे, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे ५१२
- **मला उत्तर हवंय :** मोहन आपटे, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे १६०
- **माळ ते आभाळ :** दशकांत पुजारी, माहेश्वरी प्रकाशन, वारजे माळवाडी, पृष्ठे ९६
- **भावचिंतन :** केशव कृष्णराव भोसले, रणजित घरकुल, पुणे, पृष्ठे ७२
- **मोरपिसे :** राजा खोपे, चित्रलेखा प्रकाशन ठाणे, पृष्ठे ४०
- **परडीतील फुले :** राजा खोपे, प्रेरणा प्रकाशन पुणे, पृष्ठे ६४
- **अनुदिनी :** दिलीप प्रभावळकर (एकांकीकेची चार पुस्तके), उत्कर्ष प्रकाशन, पुणे
- **नाल :** वसंत पोतदार, उत्कर्ष प्रकाशन, पुणे, पृष्ठे १२६
- **काव्यभारती :** नागेश मोगलाईकर, प्रकाशक स्वत: लेखक, पृष्ठे १९२
- **वारकरी स्वाध्याय :** लेखक व प्रकाशक नागनाथ जाधव, पुणे, पृष्ठे १६०
- **घरच्याघरी परमार्थ :** लेखक व प्रकाशक नागनाथ जाधव, पुणे, पृष्ठे १२५
- **लेले आणि मी :** अरुण टिकेकर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे २९६

# सुसंवादी संवाद

डॉ. न. म. जोशी

---

*नगर येथे संपन्न झालेल्या ७०व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाच्या निमंत्रक समितीने संमेलनोत्तर 'संवाद' हा ग्रंथ प्रकाशित केला आहे. हा एक वेगळा उपक्रम. म.सा.प.चे माजी कार्यवाह अ.भा.मराठी साहित्य मंडळाचे माजी कोषाध्यक्ष, साहित्यिक व शिक्षणतज्ज्ञ डॉ. न. म. जोशी यांनी संवादच्या वैशिष्ट्यपूर्ण उपक्रमाचे केलेले समालोचन.*

७१वे अखिल भारतीय मराठी साहित्यसंमेलन परळी वैजनाथ येथे झाले. बहात्तरावे साहित्य संमेलन मुंबई येथे झाले. साहित्यसंमेलन ही अवघ्या मराठी रसिकांची चळवळ आता अमृतमहोत्सवाकडे वाटचाल करीत आहे. प्रारंभी ग्रंथकार संमेलन एवढेच या चळवळीचे, उपक्रमाचे स्वरूप होते. बघता बघता ग्रंथकाराच्या या गंगौघात वाचक, रसिक, साहित्यविमर्शक, प्रकाशक असे प्रवाह येऊन मिसळत गेले आणि साहित्यसंमेलन अधिक समृद्ध होत गेले.

यथाकाल या प्रवाहानं काही नवीनवी वळणे घेतली. कधी पात्र बदलले, कधी संथपणे प्रवाह वाहात राहिला. पूर्वी या चळवळीची सूत्रं पुण्याच्या महाराष्ट्र साहित्य परिषदेकडे असत. पण नंतर अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ या नावाची एक शिखरसंस्था स्थापन होऊन पुणे येथील महाराष्ट्र साहित्य परिषद, मुंबईचा मुंबई मराठी साहित्य संघ, विदर्भाचा विदर्भ साहित्य संघ आणि मराठवाड्याची मराठी साहित्य परिषद अशा चार घटक साहित्यसंस्था निर्माण झाल्या. संमेलनाला अखिल भारतीय स्वरूप प्राप्त व्हावे आणि भारतात इतरत्र निवास असलेल्या मराठी साहित्यिकांना, रसिकांना प्रतिनिधित्त्व मिळावे म्हणून अ.भा.मराठी साहित्य महामंडळ या शिखरसंस्थेवर बृहन्महाराष्ट्रातील साहित्यिक-रसिकांना आवर्जून प्रतिनिधित्त्व देण्यात येते. 'नियत'कालासाठी अ.भा.मराठी साहित्य महामंडळाचा कारभार चार घटक संस्थांपैकी एकेका संस्थेकडे देण्यात येतो. आणि अ.भा.मराठी साहित्य संमेलनासंबंधी सर्व कार्यवाही महामंडळाच्या या कार्यप्रणालीद्वारे होत असते.

'संवाद'च्या समालोचनाच्या निमित्तानं हे सारं विस्तृतपणे एवढ्यासाठीच सांगितलं की, साहित्यसंमेलन आणि साहित्यमहामंडळ यांच्या परस्परसंबंधांची व कार्यप्रणालीची माहिती सर्वांनाच असते असे नाही. अ.भा.मराठी साहित्य संमेलनाच्या आसपास महामंडळाचे नाव अनेकदा ऐकू येते. नुसतं कानावरून जाण्यापेक्षा प्रत्यक्ष वाचायला मिळावं म्हणून 'संवादांपूर्वीचा हा स्वगत संवाद लिहिला. नगर येथे झालेल्या सत्तराव्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनानंतर संमेलनाच्या यजमान संस्थेने संवाद या नावाच्या ४९५ पानांचा सुंदरग्रंथ 'निव्वळ' संमेलनासंबंधी या स्वरूपात प्रकाशित केला आहे. या अ-पूर्व (पूर्वी कधीही झाला नाही असा) ग्रंथाची नोंद साहित्यसंस्था, साहित्यांमुळे, साहित्यिक, वृत्तपत्रकार आणि साहित्य या

विषयासंबंधी रुची असणाऱ्या सर्वांनी आवर्जून घेणे आवश्यक आहे.

**पूर्वप्रयत्न**

अशा प्रकारे साहित्यसंमेलनसमयी अथवा संमेलनोत्तर काही ग्रंथ-अंक प्रकाशित झाले आहेत. होत आहेत यात शंका नाही. साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षांची संमेलनातील अध्यक्षीय भाषणे ग्रंथरूपात प्रकाशित केली गेली आहेत. पण अशा ग्रंथाचे स्वरूप 'अध्यक्षीय भाषणांचा संग्रह' एवढ्यापुरतेच मर्यादित आहे. साहित्यसंमेलने आयोजित करणाऱ्या' संस्था त्या त्या वेळी आपल्या स्मरणिका, स्मारक ग्रंथ, प्रकाशित करीत असतात. अशा स्मरणिकांमधून काही साहित्यविमर्श, साहित्यपरिचय, साहित्यिक घडामोडी यांचा अंतर्भाव केला जातो. मात्र त्यांचेही स्वरूप तात्कालिक व निमित्तकारण असे असते.

**'संवाद' निर्मितीची प्रक्रिया**

'संवाद'च्या मनोगतात यशवंतराव गडाख म्हणतात,

'संमेलन होऊन जाते. पण आठवणी मागे उरतात. या आठवणी चिरस्थायी व्हाव्यात म्हणून ग्रंथ प्रकाशित करावा असे मला वाटले.

अहमदनगरच्या साहित्यसंमेलनाचे उद्घाटक होते गिरीश कर्नाड. त्यांनी निमंत्रणाचा स्वीकार करताना यापूर्वी संमेलनांविषयी काही माहिती हवी आहे अशी मागणी केली. पूर्वीच्या संमेलनांचे जे उद्‌घाटक होते त्यांची भाषणेही हवीत असे कर्नाड यांनी सांगितले. पण अशा प्रकारे पूर्वसंमेलनांची सांगोपांग माहिती देणारा ग्रंथ, पुस्तक, संदर्भसाहित्य मिळाले नाही. अर्थातच अशा प्रकारचे एखादे संदर्भपुस्तक असावे या कल्पनेचा जन्मही इथंच झाला. ३ जानेवारी, १९९७ ला संमेलनाचे उद्‌घाटन झाले आणि ठीक एका वर्षाने ३ जानेवारी, ९८ रोजी या ग्रंथाचे प्रकाशन झाले.'

या ग्रंथात असणाऱ्या साहित्याची विश्वासार्हता, सत्यता, अचूकता असणे आवश्यक आहे यासाठी आधीपासूनच खबरदारी घेतलेली दिसते.

संमेलनातील सर्व कार्यक्रम ध्वनिमुद्रित केले होते. ध्वनिफितीवरून मजकूर लिहून घेण्यात आला होता. संबंधित सर्व साहित्यिकांना त्यांची भाषणे पाठविण्यात आली. त्यांच्याकडून तपासून घेण्यात आली. संमेलनासंबंधीचा प्रत्येक दस्तऐवज असा काळीपूर्वक तयार केला आहे असे मनोगतात म्हटले आहे.

**प्रस्तावना**

'संवाद'ला अ.भा. मराठी साहित्यसंमेलनाचे माजी अध्यक्ष, कोमसापचे धडाडीचे संवर्धक, कथाकार मधु मंगेश कर्णिक यांची प्रस्तावना लाभली आहे. सामान्यपणे असा अनुभव असतो की ग्रंथांच्या प्रस्तावना, या प्रोत्साहन, शाबासकी अथवा स्वगत या स्वरूपाच्या असतात. मधु मंगेशांची प्रस्तावनाही या रीतीला अपवाद नाही. कर्णिकांनी संमेलनाचा सर्व अंगोपांगांचे यथार्थ कौतुक तर केलेच आहे. पण या प्रस्तावनेचे वैशिष्ट्य असे की या निमित्तानं काही विचारकणिका हाती येतात तर काही नव्या मुद्यांना स्पर्श होतो. मराठी साहित्यसंमेलनाच्या इतिहासाचे विवेचन करताना मराठी ग्रंथोत्तेजक मंडळींसाठी न्या. रानडे यांनी भरवलेल्या

दुसऱ्या मराठी ग्रंथकारांच्या संमेलनाचा दाखला दिला आहे. या संमेलनाचे निमंत्रण म. फुले यांना दिले होते. त्या निमंत्रणास उत्तर म्हणून म. फुले यांनी आवेशाने लिहिले होते — 'माझ्या घालमोठ्या दादा! हे तुझे साहित्यसेवेचे उपद्व्याप माझ्यासारख्या शूद्रातिशूद्राच्या काय कामाचे? तुम्हा मोठ्या ग्रंथकारांनी माझ्यासारख्या कुणबाऊ खेडूत माणसाची कधी दखल तरी घेतली आहे का? तुमचा आणि माझा कोणता आहे लागाबांधा?'

बहुजनांचा कैवार घेताना म. फुले यांनी अभिजनांचा करता येईल तेवढा शाब्दिक धिक्कार केला होता यांची नोंद कर्णिकांनी केली आहे. १८७८ साली पहिले ग्रंथकार संमेलन झाले. ग्रंथकार संमेलनाचेच प्रगत स्वरूप असलेले सत्तरावे साहित्यसंमेलन १९९७ साली नगरला झाले. या संमेलनात अभिजनांबरोबर बहुजनांचाही फार मोठा सहभाग होता. त्यावर टिपणी करताना कर्णिक लिहितात 'नगरचे संमेलन हे बहुजनांचे संमेलन झाले. खेड्यापाड्यातून हजारो माणसे संमेलनाला आली. म. फुले यांनी नगरचे हे संमेलन पाहिले असते तर त्यांना आयुष्यभर घेतलेल्या वाङ्मयीन व सामाजिक भूमिकेचे सार्थक झाल्याचा मोठा आनंद झाला असता.'

मधु मंगेश यांनी एका चांगल्या मुद्द्याला स्पर्श करून एखाद्या विचारधारेकडे विधायक दृष्टीने कसे बघता येते याचा वस्तुपाठ दिला आहे.

'साहित्य संमेलने हवीत कशाला' आणि 'साहित्य संमेलनाचे उत्सवी स्वरूप' असे विषय प्रत्येक साहित्य संमेलनाच्या आसपास चर्चेला आलेले असतात. कर्णिकांनी कोणताही संकोच न बाळगता 'साहित्य संमेलने ही नुसती उत्सवीच नव्हे तर महोत्सवी व्हावीत, कारण साहित्य संमेलन ही मराठी मनाची सांस्कृतिक गरज आहे' असे ठोसपणे सांगून टाकले आहे. मधु मंगेश यांनी स्वत:चे मत स्पष्ट शब्दात व्यक्त केले याबद्दल त्यांचे अभिनंदन करावे तेवढे थोडेच. पण त्याचवेळी साहित्यसंमेलनावर जे आक्षेप घेण्यात येतात त्यांचा परामर्श घेतला असता तर त्यांच्या विचारांना ऐतिहासिक संदर्भाची बैठक लाभून जिज्ञासू वाचकांचे पूर्ण समाधान झाले असते. साहित्य संमेलनांवर जे आक्षेप घेण्यात येतात ते सर्वच आक्षेप दुर्लक्ष करण्यासारखे असतात असे नाही. या ठिकाणी एका घटनेचे तीव्रतेने स्मरण होते. साहित्य संमेलनावर घेतल्या जाणाऱ्या आक्षेपांपैकी काही महत्त्वाच्या आक्षेपांची प्रतिक्रिया म्हणून मुंबईला 'समांतर साहित्य संमेलन' आयोजित करण्यात आले होते. मा. मधु मंगेश कर्णिक यांचे अनेक साहित्यिक सहोदर त्यात सहभागी झाले होते. मा. मधु मंगेश कर्णिक ज्या कोमसापचे अध्वर्यू आहेत त्या कोमसापची निर्मितीही अशाच काही प्रतिक्रियांतून झाली असावी. अर्थातच तरीही असे दिसून येते की साहित्य संमेलनांवरील आक्षेपांचा विचार या प्रस्तावनेत मधु मंगेशांनी साक्षेपाने टाळला असावा. तो सफाईने अथवा संकोचाने टाळला असावा.

या प्रस्तावनेत मधु मंगेश यांनी आणखी एक गोष्ट स्पष्ट केली आहे. ती अशी की निवडून आलेल्या संमेलनाध्यक्षांचे सत्कार सर्व महाराष्ट्रभर सुरू होतात. आणि आपले अध्यक्षीय भाषण लिहिण्याइतकीही निवांत फुरसत त्यांना मिळत नाही. हे खरे असेल तर त्याबरोबर हेही खरे आहे की, सत्काराची काही निमंत्रणे दूर करून अध्यक्षीय भाषणाची प्रत तयार करण्यासाठी वेळ देणे ही अप्रिय पण पथ्यकर गोष्ट करणे आवश्यक आहे. ज्या संमेलनाध्यक्षांना ही गोष्ट

करता येईल त्यांना सत्कार दूर ठेवणे क्रमप्राप्त ठरेल. निदान संमेलनोत्तर हवे तेवढे सत्कार घेतो असे म्हणता येईल.

### संवाद

संवाद या ग्रंथाचे संपादक अरुण शेवते यांचे दोनपानी संपादकीय निवेदन विचार करावयास लावणारे असे आहे. संपादकांनी स्वत:च नमूद केले आहे...

'हे शतक संपत असताना ७०व्या साहित्यसंमेलनाचा संवाद हा ग्रंथ प्रसिद्ध होत आहे, ही एक ऐतिहासिक महत्त्वाची गोष्ट आहे. आतापर्यंत झालेल्या एकाही साहित्य संमेलनाचा समग्र मागोवा घेणारा या पद्धतीचा एकही ग्रंथ प्रसिद्ध झालेला नाही. प्रत्येक साहित्यसंमेलनाचा ग्रंथ प्रसिद्ध झाला असता तर आतापर्यंतच्या साहित्यसंमेलनांचे सर्वार्थाने बदलत गेलेले स्वरूप पाहायला मिळाले असते या मुद्द्याचे पुढे विवेचन करताना संवादकार लिहितात —

'संमेलन हे वाङ्मयीन परिसंवादांपुरते मर्यादित राहत नाही. संमेलन हे समाजाभिमुख असते. संमेलनाचे स्वरूप साहित्यापुरते मर्यादित राहात नाही. त्याला सामाजिक भानही असते.'

असे म्हणताना शेवते यांनी साहित्य वेगळे आणि सामाजिकता वेगळी असे काही मुद्द्यांपुरते तरी गृहित धरले असावे असे वाटते. सामाजिकतेपासून दूर गेलेले साहित्य हे साहित्यपदवीला पोचू शकत नाही हे साहित्यविमर्शकांनीही मान्य केले आहे. संपादकीय प्रास्ताविक संवादात या संपादनासंबंधी काही सूत्रे त्यांनी सांगितली असती तर त्या पार्श्वभूमीवर पुढील वाचन सोद्देश झाले असते. सु. प्र. कुलकर्णी यांचा अनुभव नेटका आहे.

ज्ञानदेवीचा साक्षी असलेला नेवाशाच्या स्तंभाच्या चित्रकृतीच्या दर्शनाने संवादाला सुरुवात होते आणि पु. ल., कुसुमाग्रज, वसंत कानेटकर, ना. सं. इनामदार यांचे दर्शन घेत घेत आपण संमेलनाच्या मांडवात पोचतो.

### सुरेख चित्रदर्शन

विविध प्रसंगांची सुंदर छायाचित्रे हे या ग्रंथाचे आगळे वैशिष्ट्य. केवळ चित्रदर्शनानेच संपूर्ण साहित्यसंमेलनाच्या कार्यक्रमाची कल्पना साकार होते आणि विविध साहित्यिक, रसिक, त्यांचा प्रतिसाद, उपक्रम, साहित्यसंमेलनातील त्यांचा वावर यासंबंधी यथार्थ चित्र स्पष्ट होते. या सर्व छायाचित्रांत एक चित्र आगळ्यावेगळ्याच वैशिष्ट्याने उठून दिसते. ते म्हणजे 'खेड्यापाड्यातून आलेल्या हजारो रसिकांपैकी दोघे अनामिक. मधल्या वेळची शिदोरी खाताना.' हे चित्र कृष्णधवल आहे. अन्य सर्व चित्रे रंगचित्रे आहेत. पण हे चित्र अनेक अर्थांनी सूचक, बोलके आहे. 'बहुजनांचा अभिनव संमेलनात स्वेच्छा व निरपेक्ष सहभाग' याचे ते प्रतीक आहे. एवढेच नव्हे तर अभिसरणप्रक्रियेचे बोलके स्वरूप आहे. साहित्यसंमेलनात भावभावना चित्रित करून त्याचा आनंद रसिकांना घेता यावा यासाठी हे चित्रदर्शन उपयुक्त आहे.

### संमेलनातील ठराव

साहित्यसंमेलनाच्या [illegible] अधिवेशनात प्रतिवर्षीच काही ठराव केले जातात. त्यांना सांस्कृतिक चळवळीच्या दृष्टीने महत्त्वही असते. पण असे ठराव बहुधा महामंडळाकडून ठरले असतात. साहित्यसंमेलनात जे ठराव मांडून मान्य केले जातात त्यांच्या [illegible]

पाठपुरावा केला जातोच असे नाही. किंबहुना तो केला जात नाही असेच म्हणता येईल. उदा. महाराष्ट्र-कर्नाटक सीमाप्रश्न आणि सीमा भागातील मराठी भाषकांचे प्रश्न. यासंदर्भातले ठराव सतत मांडण्यात येतात. पण दरवेळी ठराव मांडून पुन्हा तो संमत करणे एवढीच प्रक्रिया होते. मध्यंतरीच्या कालखंडात या ठरावांची दखल घेण्यासाठी ज्या कुणाची जी दारे ठोठावणे आवश्यक आहे ती ठोठावली पाहिजेत असे कुणालाही वाटलेले नाही. हे या संवादमध्ये मुद्रित केलेल्या ठरावांवरून लक्षात येते. संवादने ठरावांचे कायमस्वरूपी 'रेकॉर्ड' साहित्य चळवळीच्या हाती दिले आहे.

'संवाद'ने नगरच्या साहित्यसंमेलनात संमत झालेले ठराव छापले. त्यानंतरच्या परळीच्या संमेलनात मागे संमत केलेल्या ठरावांची दखल, पाठपुरावा, तपासणी, मूल्यमापन, फलित याविषयी काहीतरी चर्चा होणे आवश्यक होते. आणि तीही या संमत केलेल्या ठरावांच्या संदर्भात असे घडले तरच साहित्यिक चळवळीला वैचारिक व कृतिशील सुसंगतता लाभेल. अन्यथा मराठी साहित्य महामंडळ किंवा साहित्यसंस्था आणि साहित्यसंमेलने ही ठरावांच्या कर्मकांडातच समाधान मानत राहिली आहेत असे वाटेल यासाठी एका ठरावाचा मुद्दाम उल्लेख करतो —

'अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाच्या मराठीच्या परीक्षांना शासनाची मान्यता व समकक्षता मिळावी म्हणून महामंडळाने सतत प्रयत्न केले आहेत. मराठीच्या विकासाच्या दृष्टीने या परीक्षांना शासकीय मान्यता व समकक्षता मिळणे आवश्यक आहे. महाराष्ट्र शासनाने मराठीच्या परीक्षांबाबतची ही मागणी त्वरित मान्य करावी अशी या संमेलनाची मागणी आहे.'

*(ठराव क्र. ८८ पृ. ४९३)*

हा ठराव जानेवारी १९९७ मध्ये संमत झाला.

या ठरावातच म्हटल्याप्रमाणे 'महामंडळाने यासाठी सतत प्रयत्न केले आहेत.' सतत प्रयत्न करूनही ही मागणी मान्य होत नसेल तर महामंडळाने पायरीपायरीने केलेल्या सर्व प्रयत्नांनंतरही मागणी मान्य होत नसेल तर कधी निकराची लढाई करण्यासाठी निर्वाणीचा क्षण उभा केला आहे काय? तसे दिसत नाही. मागील इतिहास थोडा बाजूला ठेवला तरी जानेवारी ९७ मध्ये नगरला केलेल्या ठरावासंबंधी १९९८ मध्ये परळीला झालेल्या संमेलनात, १९९९ च्या मुंबईच्या साहित्य संमेलनात महामंडळाने कोणती भूमिका घेतली? याचा विचार सहजपणे मनात येऊन जातो.

बहुतेक सर्व ठराव 'मागणी' स्वरूप आहेत. काही ठिकाणी पुनरुच्चार, नापसंती, खेद, विनंती, पाठिंबा अशा स्वरूपाचे ठराव आहेत. या पुस्तकात हे ठराव छापले हे बरेच झाले. कारण यानंतर तरी या पुस्तकाच्या आधारे ठरावाची कार्यवाही झाली का याचा शोध घेऊन शब्दसृष्टीच्या ईश्वरांच्या ईश्वरी शब्दांना कृतिरूप केले गेले आहे की नाही हे बघणे सुलभ होईल.

**गिरीश कर्नाड यांचं भाषण**

नगरच्या साहित्यसंमेलनाचे उद्घाटक गिरीश कर्नाड यांचं भाषण हा 'संवाद'चा अमोल ठेवा आहे. कन्नड आणि मराठी या दोन भाषाभगिनींच्या परस्परसंबंधाचा सखोल आढावा घेता

घेता कर्नाड यांनी एकूणच साहित्यविश्वाचं चित्र उभं करून शेवटी मृणाल सेन यांच्या कथेनं आपल्या भाषणाचा शेवट केला आहे. स्वातंत्र हे मूल्य किती महत्त्वाचं आणि त्याच्या अनुषंगानं बंधुता व समता या मूल्यांची जोपासना करणं कसं आवश्यक याचा एक वस्तुपाठच गिरीश कर्नाड देतात. गोंजारता गोंजारता ते सुस्त असलेल्यांना जाग आणतात आणि भविष्यकाळाचा वेध घेण्यास सुचवतात. रवींद्रनाथ टागोरांची एक कविता उद्घृत करून ते सांगतात-

'स्वातंत्र्याच्या स्वर्लोकात माझा देश जागृत होऊ दे'

स्पार्टा आणि अथेन्स यांचे इतिहासदाखले देऊन स्पार्टा गेलं, अथेन्स राहिलं या उदाहरणांद्वारा स्वातंत्र्यमूल्याची महतीच कर्नाड सांगतात.

**संमेलनाध्यक्षांची 'लाखाची गोष्ट'**

आळंदी संमेलनाच्या अध्यक्षा श्रीमती शांता शेळके यांनी आपल्या भाषणात एका महत्त्वाच्या मुद्द्याला स्पर्श केला आहे. समीक्षा आणि अनुवाद ही दोन साहित्यक्षेत्रं आहेत त्याहून समृद्ध व्हावीत असं त्या आवर्जून सांगतात. अनेक समीक्षकांना सर्जनशील कलावंताचा दर्जा दिला जातो. अनुवादाच्या क्षेत्रातही अनेक लेखकांनी भरीव कामगिरी केली आहे. भारताची एकात्मता साधण्यासाठी अनुवाद हे क्षेत्र उत्तम आहे. पण या दोन्ही क्षेत्रांबाबत आपण अजूनही काहीसे उदास आहोत ही त्यांची खंत योग्य आहे.

संमेलनाच्या निमित्तानं लक्षावधी रुपये गोळा होतात. संमेलनाची आर्थिक उलाढाल चाळीच पन्नास लाखांवर असते. आपल्या सर्वच आर्थिक उलाढाली प्रचंड प्रमाणावर चाललेल्या असल्यामुळे साहित्यप्रेमापोटी होणारी आर्थिक उलाढाला काहीतरी घडवत असल्यामुळे काही विघडत नाही असं शांताबाई सांगतात आणि एक अभिनव सूचना करतात —

'संमेलनाच्या निमित्तानं जे लक्षावधी रुपये जमतात त्यातील काही थोडा भाग एक लाख किंवा दोन लाख रुपये साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षांना दिले जावेत.'

लेखकांना स्वास्थ्य व सुविधा मिळण्याच्या दृष्टीने या रकमेचा उपयोग करता येईल.

श्रीमती शांताबाई शेळके. यांची सूचना नगरच्या साहित्यसंमेलनात आली. त्यानंतर परळीला साहित्यसंमेलन होऊन गेले. आता मुंबईचे साहित्यसंमेलनही नुकतेच झाले. पण शांताबाईंची 'लाखाची गोष्ट' संवादमध्ये त्यांच्या भाषणातच तसबीर होऊन राहिली आहे.

**संवादमधील साहित्य**

संवादमधील साहित्याचे दालन हे श्रीमंत दालन आहे. उद्घाटनाची ६ भाषणे, दोन सत्रातील कवींच्या १०४ कविता, सात परिसंवादातील तेवीस साहित्यिकांची भाषणे, एका मुलाखतीचा चार मुलाखतकारांचा अहवाल, लेखक-विद्यार्थी-शिक्षक मेळावा, लेखक-वाचक-विद्यार्थी मेळावा यासाठी १७ साहित्यिकांचा सहभाग. लेखकवाचक मेळाव्यात सात साहित्यिकांची मनोगते. बालमेळाव्यातील राजा मंगळवेढेकर यांचे भाषण, याशिवाय संतसाहित्याचे प्रेरणास्रोत यासंबंधी किशोरजी व्यास यांचे विचार, बाबामहाराज सातारकरांचे निरुपण, खुल्या अधिवेशनातील सहा भाषणे हा सर्व साहित्यिक मजकूर, त्याची मांडणी लक्षणीय आहे. संमेलनानंतर ज्या ज्या संस्था व व्यक्ती यांनी आपल्या प्रतिक्रिया कळविल्या, लिहिल्या

त्यांतील निवडक सात प्रतिक्रिया प्रतिसाद स्वरूपात दिल्या आहेत. ४६ मान्यवरांची पत्रे बोलकी आहेत. नगरच्या भव्यदिव्य संमेलनाबाबत सर्वांनीच आपल्या भावना मोकळेपणाने व्यक्त केल्या आहेत.

याबाबत एक गोष्ट सहजी मनात येते ती अशी की सर्व ४६ पत्रे ही स्तुतीपत्रे आहेत. या पत्रांतील स्तुती अप्रस्तुत आहे असे कोणीही म्हणणार नाही. जे भव्य घडले त्याचा दिव्य शब्दाकार या पत्रांतून व्यक्त होतो हे निश्चित. पण...

या संमेलनावर खऱ्या अर्थाने भाष्य करणारे, टीका करणारे, किंवा केवळ स्तुती नसणारे असे एकही पत्र आले नसेल का? कदाचित ती टीका अयोग्य वा अप्रस्तुतही असेल... पण असे एखादे तरी पत्र नमुन्यादाखल छापले असते तर सर्वार्थाने उचित झाले असते. अशी पत्रे आलीच नसतील किंवा आली असतील तरी त्यातील मजकूर स्वीकार्य नसेल असे संभवत नाही. तसे असेल आणि पत्रे आलीच नसतील तर वेगळे!

असे एखादे तरी पत्र छापले असते तर संपादकांच्या न्याय्य आणि सर्वसमावेशक दृष्टीचा प्रत्यय आला असता आणि अशा एखाद्या भाष्य-मजकुराच्या पार्श्वभूमीवर कौतुकाचा मजकूर अधिक उठावदार दिसला असता.

**संवाद एक इतिहास ग्रंथ**

अशा काही चर्चाविषयांचा परामर्श घेता घेता एक गोष्ट अवश्य नमूद करावी अशी आहे की संवादच्या रूपाने साहित्य संस्कृती क्षेत्रातला एक इतिहासग्रंथ सिद्ध झाला आहे. विविध पातळ्यांवर साहित्याचा अभ्यास होत असतो. अशा वेळी एक संदर्भग्रंथ म्हणून ज्या ग्रंथाचा दाखला देता येईल. संदर्भ देता येईल. यातील विवेचनाचा उपयोग करता येईल. साहित्याचा इतिहास, साहित्य, व्यवहार, समीक्षा यांबाबतचे उपयुक्त साहित्य या ग्रंथात आहे. अभ्यासकांना हा ग्रंथ एखाद्या शोध ग्रंथाइतकाच महत्त्वाचा वाटेल. उदा. अनुवादाविषयी प्रश्नाला उत्तर देताना चंद्रकांत पाटील म्हणतात, 'चांगला अनुवाद हा प्रामाणिक नसतो. तर प्रामाणिक अनुवाद चांगला नसतो (पृ. २३५), ज्ञानेश्वरी ज्या खांबाला टेकून लिहिली त्याला पैसाचा खांब का म्हणतात याचे सुरेख स्पष्टीकरण अरुणा ढेरे यांनी दिलं आहे. ही केवळ माहिती आहे. पण तीही सर्वसामान्यांना उपलब्ध नसते (पृ.३२९) अशी बरीच जिज्ञासातृप्ती या ग्रंथात आहे.

मैफल संपली ज्ञानेश्वरनगरी सुनी सुनी झाली... दै. लोकसत्तातील एका वृत्ताचे इथे सचित्र पुनर्मुद्रण केले आहे. संयोजकांनी मैफलीचा सारा आनंद शब्दांच्या रांजणी भरून संवादरूपात रसिकांच्या हाती दिला आहे. संवाद केव्हाही उघडा करावा आणि मैफलीचा आनंद लुटावा असा हा अपूर्व इतिहासग्रंथ आहे.

□

संवाद : संपादन-अरुण शेवते, प्रकाशक : यशवंतराव गडाख, अध्यक्ष, मुळा एज्युकेशन सोसायटी, सोनई, ता. नेवासी, जि. अहमदनगर, पृष्ठे - डेमी ४० + ४९६, मूल्य रु. ५००

□

डॉ. न. म. जोशी, १०१३, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत


महाराष्ट्र
साहित्य
परिषद

# मराठी कादंबऱ्यांची नाट्यरूपांतरणे : काही विचार

डॉ. वि. भा. देशपांडे

डॉ. कल्पना कामत यांनी 'मराठी कादंबऱ्यांची नाट्यरूपांतरणे' हा ग्रंथ अलिकडेच प्रकाशित केला आहे. नाटक आणि कादंबरी यांचा तौलनिक विचार करून १८८८ ते १९२० ह्या कालखंडातील कादंबऱ्यांवरून झालेली नाटके यांचा एका प्रकरणात आढावा घेतला आहे. त्या पार्श्वभूमीवर श्री. ना. पेंडसे आणि जयवंत दळवी यांच्या नाट्यविषयक कामगिरीचा विचार सविस्तर केलेला आहे. डॉ. कामत यांनी प्रस्तुत विषय पीएच्.डी. प्रबंधासाठी घेतला आहे, हे प्रथमदर्शनीच जाणवते. गेल्या काही वर्षांत अनेक प्रबंध विषय पुस्तक - ग्रंथरूपाने आपल्या समोर आलेले आहेत. ही गोष्ट स्वागतार्ह आहे. परंतु प्रबंधासाठी एखाद्या विषयाचे लेखन करणे आणि ते लेखन ग्रंथरूपाने प्रकाशित होणे हे जसे सोयीचे असते, तसेच ते अडचणीचेही ठरते. प्रबंध आहे त्या स्वरूपात पुस्तकस्वरूपात येणे कधीच योग्य ठरत नाही. त्यासाठी एका महत्त्वाच्या गोष्टीचे भान राखणे अगत्याचे आहे, ते म्हणजे तो ग्रंथ त्या विषयावरचा स्वतंत्र ग्रंथ व्हायला हवा. प्रबंधासाठी केलेली विषयाची मांडणी, तपशिलांची बहुगर्दी आणि संदर्भसूचीची चळत याच्याशी ग्रंथवाचकाला तितकेसे देणेघेणे नसते. अगदीच आवश्यक असेल तर त्यातले काही महत्त्वाचे संदर्भ ग्रंथाच्या अखेरीस द्यावेत. तेही मर्यादित स्वरूपात. त्या संदर्भांच्या चळतीवरून संबंधित विद्यार्थ्याने अभ्यासासाठी घेतलेले परिश्रम क्षणोक्षणी जाणवत राहतात, हे जरी खरे असले तरी त्याची ग्रंथात गरज किती असा प्रश्न निर्माण होतोच. त्यातही अनेक अवतरणांनी मंडित झालेला ग्रंथ पाहिला म्हणजे सर्वसामान्य त्या विषयाचा वाचक वाचनास किती उत्सुक राहील, याचाही विचार करायला हवा. प्रबंधाची स्वत:ची अशी एक लेखनशिस्त असते, ती त्या संदर्भात जरूर पाळायला हवी. पण त्याचे ग्रंथरूप होताना एक स्वतंत्र वेगळे लेखनरूप समोर यायला हवे. डॉ. कामतांना हे भान मुळात असणार, पण तरीही मूळचे लेखन आहे त्याच पद्धतीने पुस्तकरूपात यावे असे त्यांनी ठरवलेले दिसते. त्याचे परिणाम हा ग्रंथ वाचताना जाणवत राहतात.

कादंबऱ्यांवरून केलेली नाटके हा तसा नवा विषय नाही. प्रबंध पातळीवर याचा विचार याआधी झालेला आहे. कधी तो विशिष्ट लेखकाचा अभ्यास करताना किंवा कधी कधी स्वतंत्रपणाने तात्त्विक पातळीवर झालेला आहे. उदाहरणार्थ जयवंत दळवी, श्री. ना. पेंडसे, चिं. त्र्यं. खानोलकर, गो. नी. दाण्डेकर इत्यादींच्या संदर्भात हा अभ्यास अनेकदा मांडला गेलेला आहे.

डॉ. कामत यांनी 'रूपांतरणे' असा शब्द वापरला आहे. त्याविषयी चर्चा करताना त्यांनी टीप देऊन असेही म्हटले आहे, 'नाट्यरूपांतरण म्हणजे सर्व बदलांनी युक्त असा अवस्थांतरण



अनुक्रमणिका

हा अर्थ अभिप्रेत आहे.' खरेतर त्या दोन्ही शब्दांच्या अर्थाला मर्यादा आहेत. 'कलांतर' असाही शब्द काहीजण वापरतात. ह्या शब्दसंकल्पनेला भिन्न छटा आहेत. त्यातून पूर्णार्थ प्रकट होतोच असे नाही. कारण कादंबरीवरून किंवा कादंबरीचे नाट्यरूपांतर, केलेले नाट्यलेखन असे शब्द आपण वापरतो. त्यावेळी कादंबरी आणि नाटक ह्या दोन्ही वाङ्मयप्रकारांची चर्चा अभिप्रेत असतेच. डॉ. कामत यांनी ती विस्ताराने केलेली आहे. ती चर्चा करताना त्याही एका निष्कर्षाप्रत आलेल्या दिसतात; 'नाट्यरूपांतरण हे स्वतंत्र नाटकापेक्षा कमी दर्ज्याचे समजले जाते. तसे समजण्याचे वस्तुत: काही कारण नाही. तसेच नाट्यरूपांतरण म्हणून वेगळा वाङ्मयप्रकार निर्मिण्याची आवश्यकता नाही. नाट्यरूपांतरणाकडे प्रथम एक नाटक म्हणून पाहावयास हवे. त्यानंतर केवळ एक कुतूहल म्हणून त्याची मूळ कादंबरीशी हवी असल्यास तुलना करावी. चरित्र, आत्मचरित्र, काव्य, कथा इत्यादी वाङ्मयप्रकारांतून मूळ कथात्म अनुभव घेऊन नाट्यनिर्मिती जशी होत असते तशीच प्रक्रिया याही ठिकाणी होत असते. चांगला नाटककार हा नेहमी, मूळ कादंबरीच्या आराखड्यात केवळ बंदिस्त न राहता, अधिकाधिक मुक्तपणे, मूळ नाट्यबीजास गोचररूप देण्यात दक्ष असतो.... *कोणतेही नाट्यबीज, स्वत:चा आकृतिबंध घेऊनच जन्माला येत असते...'*

एका बाजूने रूपांतरण, अवस्थांतरण म्हणायचे आणि दुसऱ्या बाजूने नाट्यबीज स्वत:चा आकृतिबंध घेऊन येते असे प्रतिपादायचे हा विरोधाभास वाटतो. प्रत्येक साहित्यकृती ही स्वतंत्र, स्वायत्त असते, असावी अशी अपेक्षा असते. ती कलाकृती सिद्ध करताना अथवा अविष्कृत करीत असताना लेखकाने कोणते मूलाधार घेतले आहेत ही गोष्ट गौण ठरते. कादंबरी-नाटक यांच्या संबंधांपुरतेच बोलायचे तर असे म्हणता येईल की, नाट्यलेखक नाट्यलेखनासाठी आधार म्हणून स्वत:च्या किंवा इतरांच्या कादंबरीचा कधी विषय-आशय-व्यक्तिरेखा काही विशिष्ट प्रसंग घेईल इतकेच. ती त्याच्या नाट्यलेखनाची कच्ची सामग्री असते. त्यावरून लिहिलेले नाटक हे स्वतंत्र, स्वायत्तच असावे लागते. त्या दोन्ही वाङ्मयप्रकारांचे व्यक्त होण्याचे लेखन धर्म भिन्नच आहेत. ज्यावेळी वाचक ते नाट्यलेखन वाचतो किंवा प्रेक्षक ते रंगमंचावर पहात असतो तेव्हा त्याला नाट्यलेखनाचा मूलाधार माहीत असतोच असे नाही. जरी तो मूलाधार त्याला माहीत नसला तरी त्याच्या आस्वादात कोणताही फरक पडत नाही, पडण्याचे कारण नाही. काही वेळेला उलटाही प्रकार घडतो. जयवंत दळवी यांनी 'सूर्यास्त' हे नाटक आधी लिहिले आणि त्या विषयावरची कादंबरी नंतर लिहिली. ह्या उलट्याक्रमाचाही विचार करण्यासारखा आहे.

नाटक प्रयोगसापेक्ष आणि प्रेक्षकसापेक्ष असते, याचे भान डॉ. कल्पना कामत यांना जरूर आहे. एका बाजूने नाटकाचा वाङ्मयीन अभ्यास विशिष्ट मर्यादेपर्यंत जरूर करता येतो. परंतु तो अभ्यास करताना वा ग्रंथरूपाने मांडताना रंगभूमी ह्या कलामाध्यमाचा विचार मांडणे आवश्यक असते. नाटक हा अर्ध वाङ्मय प्रकार आहे. त्याची परिणती प्रयोगरूपात आल्यावरच त्या कलाकृतीला पूर्तता प्राप्त होते. उपलब्ध नाट्यसंहितेत प्रयोग शक्यता किती आणि कशा आहेत याचा शोध अभ्यासकाला घ्यावाच लागतो. स्थल, काल आणि कृती ह्या

नाट्यत्रयतत्त्वांचे भान नाट्यलेखनाने कितपत राखले आहे याचा तपास सप्रमाण घ्यावा लागतो. 'आत्ता आणि इथे' ही नाट्यलेखनाची तसेच नाट्यप्रयोगाची प्रतिज्ञा असते. त्यातली दृश्यात्मकता आणि कृतीशीलता ही परिणामकारक असते. असे बंधन अन्य कोणत्याच साहित्य प्रकाराला असत नाही. ते प्रयोगरूप रंगमंचावर होईपर्यंत दिग्दर्शक आणि कलाकार - तंत्रज्ञ यांची सर्जनशीलता मूळ लेखनाचे सौंदर्य विकसित करीत असते. कारण दिग्दर्शकाने नाट्यसंहितेवर घेतलेला - केलेला स्वरूपनिर्णय, कलाकारांची अभिनयप्रतिभा ह्या सर्व नाट्यरसातून तो मूर्त होत जातो. ह्या प्रक्रियेचा नाट्यलेखनाशी अनिवार्य संबंध असतो. तो संबंध किती आणि कसा आहे हे सांगणे, सिद्ध करणे गुंतागुंतीचे असले तरी शक्य आहे. जयवंत दळवी, श्री. ना. पेंडसे यांच्या नाटकांपुरते बोलायचे झाल्यास 'बॅरिस्टर', 'संध्याछाया', 'कालचक्र', 'दुर्गी', 'रथचक्र' इत्यादी नाटके रंगमंचावर मान्य झाली, स्थिरावली याची जी कारणे आहेत त्यामध्ये त्यांच्या मूळ संहितांच्या बरोबरीने दामू केंकरे, विजया मेहता, कमलाकर सारंग, विक्रम गोखले नसते तर ही नाटके मराठी रसिकांच्या स्मरणात दीर्घकाल राहिली असती का, असा प्रश्न निर्माण होतो. त्याचबरोबर ते नाट्यलेखन रंगमंचावर आणि नंतर पुस्तकरूपाने सर्वांसमोर येईपर्यंत ह्या दिग्दर्शक-अभिनेत्यांचा प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष सहभाग किती होता याचाही अभ्यास होणे आवश्यक आहे. त्यांच्यामुळेच काही महत्त्वाच्या नाट्यसंहिता सिद्ध झाल्या आहेत ही वस्तुस्थिती आहे. हे मी सारे जवळून पाहिले, ऐकले, अनुभवले आहे. नाटकाचा अभ्यास करणाऱ्या नव्या मंडळींनी थोडे अधिक परिश्रम घेऊन तो तपशील मांडणे आवश्यक आहे. डॉ. कामत यांनी यासाठी काही मुलाखतींचा हवाला दिला आहे. तरीही आपण केवळ नाट्यसंहितांचाच अभ्यास करणार आहोत, आपल्याला त्याच्या रंगमंचीय प्रयोगरूपाशी किंवा एकूणच त्या रंगव्यवहाराशी काहीच कर्तव्य नाही ही भूमिका पुरेशी ठरणारी नाही. निदान नाटकाच्या, अभ्यासकांना नाहीच नाही. आधुनिक काळातील नाटक हे रंगभूमी व्यवहाराशी इतके निगडीत आहे की त्याचे तुकडे पाडून अभ्यासणे अवघड होते आहे.

कथाकार, कादंबरीकार नाट्यलेखनाकडे का वळतात? यावर पेंडसे, दळवी, माडगूळकर, पु. भा. भावे आदींनी त्या त्या वेळी काही प्रमाणात उत्तरे दिली आहेत. त्यातली काही कारणे कलात्मक आहेत तर काही व्यावहारिक आहेत. मराठीत ज्यांना कथाकार-कादंबरीकार म्हणून नावलौकिक मिळाला त्यांनी नाट्यक्षेत्राचे आव्हान कसे स्वीकारले? त्या माध्यमाचा त्यांनी किती विचार केला? प्रत्येक नवा विषय किंवा नवा आशय आपला आकृतिबंध घेऊन येतो, असा अपरिहार्यपणाने ह्या कादंबरीकारांच्या संदर्भात नाटकाचा आकृतिबंध कितीसा आला? कथा, कादंबरीचा वाचक मोठ्या प्रमाणात असू शकतो. परंतु त्याची प्रतिक्रिया साक्षात समजायला वेळ लागतो. नाटकाच्या बाबतीत तसे होत नाही. नाटकाच्या एका प्रयोगास हजार-पाचशे माणसे एकत्रित स्वरूपात आपली प्रतिक्रिया देत असतात. नाटकाचे बऱ्यापैकी प्रयोग होत राहिले तर नाटककाराचे नाव रोज जाहिरातीत-छाप्यामध्ये येणे शक्य असते. नवीन नाटक लिहून द्या अशी मागणीही होत असते. आर्थिक लाभ तर असतोच. शिवाय त्यातून येणारी प्रतिष्ठा निराळीच असते. भल्याभल्यांना



अनुक्रमणिका

ही मोहात टाकणारी गोष्ट ठरली. नाटकातून मिळणारी प्रतिष्ठा-पैसा ही तातडीक असतात पण हे व्यावहारिक सत्य मोकळेपणाने कोणी मान्य करताना द्रिसत नाहीत.

प्रस्तुत ग्रंथाच्या सहाव्या आणि अखेरच्या प्रकरणात 'मराठी नाटकाचा धावता आढावा : एक समृद्ध अनुभव' घेण्याचा यत्न आहे. आढावा धावता असला तरी तो फारच त्रोटक आहे. त्याला नेमके सूत्र नाही. त्यातून फारसे काही हाती लागत नाही. असा आढावा घेताना अपेक्षित असे असते की, नाटक रंगभूमीच्या परिणामाच्या संदर्भात ह्या नाट्यरूपांतरणाचे नेमके स्वरूप काय होते याचा ऊहापोह हवा होता. जेव्हा 'बॅरिस्टर', 'संध्याछाया', 'रथचक्र' इत्यादी नाटके लिहिली गेली, रंगमंचावर प्रयोगित झाली तेव्हा अन्य महत्त्वाची नाटके कोणती होती याचा तुलनात्मक विचार मांडायला हवा. तत्कालीन नाटक-रंगभूमीच्या प्रेरणा-प्रवृत्ती कोणत्या होत्या, अशा स्वरूपाचा आलेख मांडला गेला असता तर या अभ्यासाला अधिक अर्थपूर्णता आली असती. याच बरोबरीने आणखी एका प्रयत्नाची जोड तुलनात्मक मांडणे आवश्यक होते. जेव्हा कादंबरीकार स्वत:च स्वत:च्या कादंबरीचे नाट्यरूपांतरण करतो, जेव्हा त्याच्या कादंबरीवरून दुसरा कोणी ते करतो तेव्हा त्यातले नाट्यबीज किती विकासते, कोमजते ते पहायला हवे. वसंत कानेटकरांसारखा सिद्धहस्त नाटककार शांता निसळ यांच्या 'बेघर' कादंबरीवरून 'पंखांना ओढ पावलांची' हे नाटक लिहितो आणि कलात्मकदृष्ट्या ते तितके परिणामकारक वाटत नाही, ते का? जयवंत दळवी यांच्या 'महानंदा' वरून 'गुंतता हृदय हे' शं. ना. नवरे लिखित सर्वसामान्य असलेले नाटक रंगमंचावर मोठ्या प्रमाणात लोकप्रिय झाले, ते का? तीच गोष्ट चिं. त्र्यं. खानोलकर यांच्या कादंबऱ्यांवरून अन्य मंडळींनी केलेल्या नाट्यरूपांतरणांच्या संदर्भात तपासून पाहावी लागेल. ह्या नाटकांचे प्रासंगिक उल्लेख आलेले आहेत, पण रूपांतरण करणारा स्वत: आणि अन्य असणे यातून निर्माण होणाऱ्या तात्त्विक मुद्यांची चर्चा विस्ताराने व्हायला हवी होती. कदाचित मूळ प्रबंध विषयाचा आराखड्यात काही मर्यादा आखून घेतल्या असतील, पण त्याचे ग्रंथरूप करताना नवीन मुद्यांची भर घालणे शक्य असते, ते करायला हवे.

या निमित्ताने आणखी एक विचार मनात येऊन गेला, तो नवा नसला तरी महत्त्वाचा आहे. तो म्हणजे एक कथाबीज, भिन्न, भिन्न कलाप्रकारात कसे बदलत जाते किंवा नाही याचा शोध असायला हवा. 'बॅरिस्टरची तीन रूपे' या पुस्तकात उमा दादेगावकरांनी तो अभ्यास चांगल्या पद्धतीने मांडला आहे. तरीही त्यात 'रावसाहेब' (बॅरिस्टरवरचा हिन्दी चित्रपट) याचा उल्लेख नाही. कारण तो चित्रपट नंतर झाला. तिथेही एका वेगळ्या पद्धतीने विचार करता येईल. नाटक आणि चित्रपट याच्या दिग्दर्शिका विजया मेहताच होत्या. त्यांनी दोन्ही माध्यमात 'बॅरिस्टर' कसा वेगळा पाहिला. नाटक जितके परिणामकारक झाले तेवढा चित्रपट भावला नाही, त्याची कारणे काय असतील? कथाबीज, त्याची मांडणी, अभिनय, दिग्दर्शन आणि एकूणच निर्मिती यात गुणात्मक फरक होता का? तर तो नक्कीच होता. तीच गोष्ट 'रथचक्र' या कादंबरीबद्दल सांगता येईल. 'रथचक्र' ही श्री. ना. पेंडसे यांची लोकमान्य-साहित्यप्रेमींना मान्य अशी कादंबरी. त्यावरून नाटक तयार केले गेले.

कमलाकर आणि आणि लालन सारंग यांनी अपार श्रम करून ते रंगभूमीवर उभे केले. त्यावरूनच दूरदर्शनची मालिका हिन्दीतून केली. तीही लक्षवेधी ठरली. 'आनंदीगोपाळ' या लेखनाचा प्रवास चरित्र-कादंबरी-नाटक-दूरदर्शन मालिका असा झाला. जयवंत दळवींची 'सावल्या' कादंबरी दुर्गीच्या रूपाने नाटकात आली. पुढे ती सावल्या नावानेच मालिकेत आली. ती मालिका नाटकापेक्षा अधिकतेने रसिकमान्य झाली. नाटक आणि मालिका यांचे दिग्दर्शन दामू केंकरे यांचे होते. रणजीत देसाई यांची स्वामी कादंबरी किती लोकप्रिय झाली ते नव्याने सांगण्याची आवश्यकता नाही. त्यावरून नाटक रूपांतरीत झाले, पुढे मालिकाही तयार झाली. ना. ह. आपटे, साने गुरुजी, पु. भा. भावे, खांडेकर इत्यादींच्या कादंबरी लेखनावरून झालेले चित्रपट किंवा मालिका अशी अनेक उदाहरणे सांगता येतील. आता इथून पुढच्या टप्प्यातल्या अभ्यासकांनी अशा नव्या आवाहनांचा-आव्हानांचा विचार करायला हवा. त्यासाठी वाङ्मयाचा तर सखोल अभ्यास हवाच, पण त्याचबरोबर नाटक-रंभगूमी-चित्रपट-मालिका या माध्यमांचाही तितकाच अभ्यास करायला हवा. तो ग्रंथरूपाने सर्वांसमोर मांडायला हवा. त्यातून वाचकाला या भिन्नरूपांचे दर्शनही घडेल आणि ज्यांना नव्याने आपल्या कथा-कादंबऱ्यांवरून नाटक, चित्रपट, मालिका ह्यांमध्ये रूपांतरण करायचे असेल त्यांना काही प्रमाणात दिशाही मिळेल !

❑

डॉ. वि. भा. देशपांडे
सुरजपार्क, २७/३ डहाणुकर कॉलनी,
कोथरूड, पुणे ४११ ०२९.

---

## स्वागत

❑ **घर अंगण** : इंदुमती लिमये, संजय रघुनाथ धोपावरकर प्रकाशन, अहमदनगर, पृष्ठे ९९
❑ **शोधाच्या नव्या वाटा** :संपा. हरि नरके, महात्मा ज्योतिबा फुले प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ३२८
❑ **उमलताना** : कु. आदिती कुलकर्णी, आदिश प्रकाशन, बदलापूर, पृष्ठे ५६
❑ **मरणकळा** : सौ. जनाबाई कचरू गिऱ्हे, गिऱ्हे प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १००
❑ **निरूपण** : किशोर पाठक, अक्षरमुद्रा प्रकाशन, नासिक, पृष्ठे ६४
❑ **आभाळाचा अनुस्वार** : किशोर पाठक, अक्षरमुद्रा प्रकाशन, नासिक, पृष्ठे ११२
❑ **मुक्काम पोस्ट देवाचे गोठणे** : माधव कोंडविलकर, ग्लोरिया प्रकाशन, देवरुख, पृष्ठे ६६
❑ **नामसुधा** : सुधाकर पुरंदरे, नीळकंठ प्रकाशन, पुणे, पृष्ठे ५८
❑ **श्यामकांतची पत्रे** : संपादक-कृष्णा करवार, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ३९८
❑ **अतित** : शं. श्री. वाशीकर, वाग्विलास प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ३१

**महाराष्ट्र ग्रंथभांडार, कोल्हापूर यांची प्रकाशने**

❑ **छत्रपति शाहू स्मृतिदर्शन** : हिंदुराव साळुंके, पृष्ठे २४०
❑ **स्पर्श आनंदाचा** : स्वामी शिवानंद सरस्वती, पृष्ठे २०४
❑ **निरूक्त** : निलांबरी कुलकर्णी, पृष्ठे ७२
❑ **गौरीचं आठवं पाऊल** : निलांबरी कुलकर्णी, पृष्ठे १३९



अनुक्रमणिका

# जळगावात भरलेले पहिले समरसता साहित्यसंमेलन

व्यंकटेश कामतकर

*सामाजिक प्रवाहांचे एकसंधपण साधून ते टिकवण्यासाठी महाराष्ट्रात वेळोवेळी प्रयत्न झाले, कधी ते अध्यात्मिक भूमिकेतून झाले तर कधी राजकीय आकांक्षांतूनही झाले. विसाव्या शतकाच्या अखेरच्या दशकात साहित्यातून समरसता साधण्यासाठीच्या प्रयत्नांचा एक भाग म्हणून जळगाव येथे ७ व ८ नोव्हें १९९८ या दोन दिवसात 'समरसता साहित्य संमेलन' भरवले गेले. त्यासंबंधीचे हे विशेष.*

शनिवारी सात तारखेला सकाळी समरसता ग्रंथ दिंडी स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या पुतळ्यापासून निघाली. या वेळेपासून संमेलनास सुरुवात झाली. प्राचार्य अनिराव आणि नगराध्यक्ष सौ. पुष्पाताई पाटील यांनी प्रदर्शनाचे उद्घाटन केले आणि मग दहा वाजता सम्मेलनाचा उद्घाटन सोहळा झाला. यावेळी साहित्य संस्कृति मंडळाचे अध्यक्ष आणि ७१ व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्रा. द. मा. मिरासदार प्रामुख्याने उपस्थित होते. स्वागताध्यक्ष एकनाथराव खडसे, पाटबंधारे मंत्री महाराष्ट्रराज्य यांनी जळगावचा महाराष्ट्राच्या साहित्यातील सहभाग नमूद केला आणि '...समरसतेचा विचार व त्याला मिळणारी आचारात्मक उपक्रमांची जोड यातून समाज मनावर जो प्रभाव उत्पन्न होईल तो एकरस-समाजनिर्मितीसाठी पोषक ठरेल.' असा विश्वास व्यक्त केला. दलित साहित्य एकांगी बनत चालण्याचा डॉ. जनार्दन वाघमारे यांचा विचार उद्धृत करून श्री. भिकूजी इदाते यांनी समरसता ही कल्पना मुळात मनात बदल घडविण्याच्या प्रक्रियेचे नाव आहे असे सांगत सामाजिक समरसता मंचाची समरसता साहित्यामागची भूमिका कार्याध्यक्ष या नात्याने विशद केली. त्यानंतर संमेलनाध्यक्ष डॉ. आनंद यादव यांनी साहित्यिक हा प्रथम साहित्यिक आहे हे प्रतिपादन करीत समाजाचे आणि साहित्याचे नाते प्रस्थापित करता येण्याची कुवत असणाऱ्या समरसता साहित्यिकांनी आपल्या साहित्यात 'काय नसावे' हे विस्तारपूर्वक सांगितले. पुढे ते म्हणाले, 'सामाजिक समरसतेची कल्पना सबंध भारतीय समाजाला गवसणी घालणारी आणि भारतीय नवयुगाला सामोरी जाणारी आहे. तिला अंतर्गत संघर्ष टाळून नवभारतीय युगाचा एकात्मरूप सलग समाज उभा करायचा आहे. अशा समाजनिर्मितीला उपकारक, प्रेरक आणि उत्थानकारक साहित्यनिर्मिती समरसता मंचाला अभिप्रेत आहे. त्यामुळे अशा साहित्यातही आपोआपच भारतीय नवसमाजनिर्मितीची

मूल्ये अभिप्रेत आहेत. ही मूल्ये ज्या महात्मा फुले, डॉ. आंबेडकर, संत गाडगेमहाराज, डॉ. हेडगेवार, गोळवलंकरगुरुजी इत्यादी भारतीय संत सुधारकांनी निर्मिली त्यांचीच प्रेरणा घेऊन महाराष्ट्रात यापूर्वीच काही चळवळींनी आपापल्या परीने साहित्यनिर्मिती केलेली आहे त्यांचा तो खारीचा वाटाही या सेतुबंधनात उपयुक्त ठरेल.' डॉ. आनंद यादवांच्या विचारगर्भ व्याख्यानापूर्वी प्रा. द. मा. मिरासदार यांचे उद्घाटनपर भाषण झाले.

समरसतेची संकल्पना या विषयावर दुपारी २.३० ते ४.३० पर्यंत झालेल्या परिसंवादाची श्री. मा. गो. वैद्य यांनी अध्यक्षता केली. त्यात प्रा. अनिरुद्ध देशपांडे यांनी समरसतेची भूमिका मांडली. श्री. रमेश पतंगे (संपादक, सा. विवेक) यांनी पू. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या साहित्यातील समरसतेचा विचार विवरण करून श्रोत्यांसमोर ठेवला आणि 'राघववेळ' या कादंबरीचे लेखक श्री. नामदेव कांबळे यांनी लोकशाहीर अण्णाभाऊ साठे यांचे ललित साहित्य व समरसता यांचा अन्योन्य संबंध दाखवून दिला. तीनही वक्ते व अध्यक्ष यांची व्याख्याने अभ्यासपूर्ण आणि विचार परिप्लुत होती.

दुसरा परिसंवाद सायं ५ ते ६.३० यावेळेला प्रा. अनंतराव तोरो यांच्या अध्यक्षतेखाली झाला. मराठी साहित्यात उमटलेले समरसतेचे प्रतिबिंब हा विषय होता. प्रा. डॉ. चंद्रकांत वर्तक यांनी कथा कादंबरीमध्ये हे प्रतिबिंब कसे पडले आहे हे सांगितले तर प्रवीण दवणे यांनी केशवसुत आणि त्यानंतरच्या मराठी कवितेतील समरसता प्रकाशात आणली. हरवलेले माणूसपण शोधणे आणि ते जपणे हा तर विकसित, माणूसपणाचा पुरावा आहे आणि तो कवितेच्या सोबतीने सापडत जातो आहे हेच मराठी कवीकुलाचे यश आहे असे ते म्हणाले. प्रा. शाम अत्रे (डोंबिवली) यांनी आत्मकथनांत समरसतेचे पडलेले प्रतिबिंब दाखवताना 'व्यक्ती व समाज यांचे परस्परसंबंध आणि अनुबंध लक्षात घेता सामाजिकतेचे भान आत्मचरित्रात प्रकट होणे स्वाभाविक आहे' असे सांगत संत नामदेवापासून बेबी कांबळे याच्या 'जिणं आमुचं' या आत्मचरित्रपर पुस्तकापर्यंताच्या, आत्मचरित्रांची दखल घेतली आणि 'आत्मचरित्रे समूहमनाचे विविध समाजसमूहाचे प्रतिनिधित्व करतात. या प्रातिनिधिकतेमुळे त्यांना सार्वकालिनता विश्वात्मकता लाभण्याची शक्यता आहे. हा आलेख त्यातील समाजचित्रणामुळे सामाजिकतेच्या जाणीवेमुळे समरसतेच्या संकल्पनेजवळ येऊन पोहोचला आहे' असे प्रतिपादन केले.

रात्री साडेनऊनंतर सुरू झालेल्या कविसंमेलनात निमंत्रित कविवर्यांपैकी फारच थोडे सहभागी झाले. प्रा. श्री. राजा महाजन (जळगाव) यांच्या अध्यक्षतेखाली झालेले हे कविसंमेलन रात्री एक वाजता संपले. सर्वश्री प्रल्हाद चेंदवणकर, नाना बापट, डॉ. कल्याण इनामदार, श्री. जयंत भिडे, श्री. भास्करराव कुलकर्णी (बडनेरा), सौ. अरुणा कुलकर्णी (औरंगाबाद), श्री. प्रकाश किनगावकर (महाजन) जळगांव यांनी आणि इतर सत्तर कवींनी कवितावाचन केले. या कविसंमेलनाचे सूत्रसंचालन मी केले.

रविवारी 'मी अनुभवले मी सोसले' लेखकांची प्रगट मुलाखत सकाळी झाली,



अनुक्रमणिका



त्यात सौ. प्रतिमा इंगोले यांनी भाग घेतला. प्रा. सौ. मीनाक्षी ब्रह्मे, प्रा. श्री. मंगला सिन्नरकर, श्री. लक्ष्मीकांत धोंड आणि सौ. माधुरी उटगीकर यांनी मुलाखती घेतल्या.

नंतर सौ. रेखा बैजल यांचे कथाकथन झाले. दुपारी तिसरा परिसंवाद झाला तो '२१व्या शतकातील साहित्य आणि समरसता' या विषयावर अध्यक्ष होते प्रा. डॉ. प्रभाकर मांडे. तर श्री. गिरीश प्रभुणे, डॉ. भास्कर गिरिधारी आणि प्रा. वि. ल. धारूरकर यांनी आपले विचार मांडले. समारोपाच्या समारंभात समरसता मंचाचे कार्याध्यक्ष श्री. भिकूजी इदाते यांनी ९९ साली औरंगाबादेत हे सम्मेलन होणार असल्याची घोषणा केली. त्याचबरोबर समरसता साहित्यपरिषदेची स्थापना होत असल्याचेही त्यांनी जाहीर केले. या स्थापनेमुळे समरसता साहित्यसंमेलनास कायमस्वरूपी व्यवस्था लाभेल. यांचे नेतृत्त्व प्रा. अनंतराव तोरो यांचेकडे राहून त्यांना रमेश पतंगे, प्रा. शाम अत्रे, प्रा. रमेश महाजन, सुधीर जोगळेकर, अरुण करमरकर हे साह्य करणार आहेत.

यावेळी बोलताना प्राचार्य राम शेवाळकरांनी समरसतेची संकल्पना उचलून धरली आणि ज्यांनी हा प्रश्न मांडला त्यांच्यामागे उभे राहण्याचे आवाहन केले. पुढील वर्षी आपल्याला काही सेवा सांगितल्यास ती आपण करू असेही त्यांनी नमूद केले.

आपल्या समारोपाच्या भाषणात डॉ. आनंद यादव यांनी म्हटले की 'गेले दोन दिवस चाललेल्या चर्चेतून हे लक्षात आले आहे की समरसता हे एक नवे वाङ्मयीन मूल्य निर्माण होऊ पहात आहे. समरसता साहित्य हे उच्च भारतीयतेचे भान असलेले साहित्य असावे' अशी अपेक्षा अध्यक्ष डॉ. आनंद यादव यांनी व्यक्त केली आणि त्यानंतर समरसता साहित्य सम्मेलनाची सांगता आभार मानून झाली.

एकूणच सर्वच साहित्याकडे 'समरसते'च्या दृष्टीने पाहण्याचा वैचारिक चष्मा सहयोगी सदस्य अथवा प्रतिनिधींना जळगावात मिळाला असे म्हणायला हरकत नसावी.

☐

व्यंकटेश कामतकर
विश्रामकुटी, ११४/८ मुरारजी पेठ,
सोलापूर ४१३ ००१.

---

## स्वागत

- ❑ **आठवणीतले नरहर कुरुंदकर :** गोविंद कुलकर्णी, कीर्ती प्रकाशन, नांदेड, पृष्ठे ९४
- ❑ **परिवर्तनशील भारत अर्थात स्वतंत्र भारताचा राजनैतिक इतिहास :** प्रा. सुधाकर वझे शुभदा सारस्वत प्रकाशन, पुणे, पृष्ठे १६४
- ❑ **मायवाटेचा मागोवा :** तारा भवाळकर, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे १५२
- ❑ **वडगांवचा शिवा :** धर्मराज माहुलकर, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे ४६
- ❑ **बाळराजा :** चंद्रकांत पारकर, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे ७२
- ❑ **चळवळीच्या कविता :** राजेश ग्यानुजी डोंगरे, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे ५६
- ❑ **अंतरा :** विमल लिमये, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे ६४

# १९९८ दिवाळी अंक - उल्लेखनीय

संकलन : म. श्री. दीक्षित

---

*दिवाळी अंकांमधील वैचारिक स्वरूपाच्या लेखनाकडे लक्ष वेधावे या हेतूने गेल्या दोन वर्षांपासून प्रस्तुतचा उपक्रम सुरू करण्यात आला आहे. त्यासाठी जेवढे अंक चाळता-वाचता येतील तेवढे मिळविण्याचा यत्न असतो. जे अंक निखळ कथा, कादंबरी, कविता अशा साहित्यासच वाहिलेले असतात त्यांचा विचार इथे केला जात नाही. यंदाचे अंक न्याहाळताना एक गोष्ट सहज जाणवली. ती ही की आरोग्य, ज्योतिष, धर्म, सौंदर्य या विषयांचा अंतर्भाव असणारे अंक वाढत्या प्रमाणावर प्रसिद्ध झालेले आहेत. त्या अंकातील बहुतेक महत्त्वाच्या लेखांचा नामनिर्देश प्रस्तुतच्या यादीत करण्यात आला आहे. यादी वर्णानुक्रमे, अंक, संपादक, मूल्य, लेखाचे शीर्षक आणि लेखकाचे नाव या क्रमाने केलेली आहे. काही त्रुटी राहिल्या असतील तर अंकांची अनुपलब्धता किंवा संकलकाच्या मर्यादा हे त्यामागचे कारण समजावे. त्यासाठी आधीच क्षमा असावी ही विनंती. उपक्रमाचे स्वागत होत आल्याने तो यंदाही आवर्जून केला आहे.*

**अंतर्नाद :** भानु काळे
द गॉड ऑफ स्मॉल थिंग्ज — *वि. ग. कानिटकर.* अतिपूर्वेकडील अपूर्व अनुभव — *अरविंद गजेंद्रगडकर,* माझ्या आत्मचरित्राची निर्मितीप्रक्रिया-*आनंद यादव.* मन:पटलावरील स्थापित मैफली — *दत्ता मारुळकर.*

**अधिष्ठान :** मनोहर पांचाळ
त्रिसूत्र राष्ट्र उत्थापनाचं — *दिलीप चावरे.* लेखणीची शक्ती (तस्लिमा नसरीन) — संजीवनी खेर. मागे वळून पाहताना-*संकलन विद्या ओक* (चित्रपट, क्रीडा, राजकारण क्षेत्रातील इ. नामवंतांचे आत्मावलोकन). कायद्याचे राजमार्ग अन पळवाटांचे आडमार्ग — *सुभाष आफळे.*

**अनंत :** जयवंत राऊत
खांडेकरांच्या साहित्यातील मूल्यविचार — हरिचंद्र थोरात. ताटीच्या अभंगातून दिसणारी मुक्ताई — *अशोक ना. जाधव*

**अनुराधा :** अरविंद व दिलीप नाडकर्णी
स्वदेशीचे व्रत कालचे आणि आजचे — *गो. स. कामत,* निसर्गप्रेमी कलावंत रस्किन बाँड — *भालचंद्र गुजर*

**अपूर्व :** शिवराज गोर्ले
अभिरूची खरंच घडवता येते का? (काही कलाकार व लेखक यांच्या मुलाखती,) कवी तो पानोपानी (सुधीर मोघे) — *स्वाती कर्वे,* मादाम तुसाँचे घर मेणाचं-अंजली कीर्तने. आकाशाशी जडले नाते (अमेरिकेतील गगनचुंबी इमारती)-*अश्विनी धोंगडे.*

**अभिजात :** स्मिता पटवर्धन
निसर्ग संसार विशेषांक - *प्र. न. जोशी, विनायक पाटील, प्रकाश गोळे, उष:प्रभा पागे.* इ. चे लेख. ईशान्येचे वेगळेपण-*योगेश गोखले.* अमेरिकन कुटुंबव्यवस्थेची दुर्दशा-*वि. वि. गोखले*

**अमृत :** मनोहर शहाणे-अरविंद पोतनीस
अमृतलहरी गंगालहरी-*म.बा. कुलकर्णी,* पूर्व हिमालयातील फुलपाखरांच्या व्यापार-*दीपक मंडलिक,* डायनोसार म्युझियम-*प्रभाकर सोवनी,* धुमाकूळ दहशत वादाचा-*संजय पाठक,* मध्यमवर्गाची बदलती शैली-*ना.य. डोळे,* आरोपीच्या पिंजऱ्यात डॉक्टर - *नी.बा. गोडबोले.*

**अक्षरपान :** अरुणा ना. शिंदे
कालसापेक्ष अभिरूची आणि साहित्यिकांचे स्थान-*म. द. हातकणंगलेकर,* दलित नाटकातील विद्रोह-*विठ्ठल शिंदे.*

**अक्षरप्रतिष्ठा :** लक्ष्मीकांत देशमुख
शेतकरी आंदोलन आणि साहित्यिक - *शरद जोशी.*
मराठी स्त्रीकविता-*अनुराधा पाटील, सुलभा हेर्लेकर.*

**आनंदपर्व :** भाग १ व २
मराठीतला पहिला ऑडिओ वार्षिक-दिवाळी अंक.
शांता शेळके, वसंत बापट, सुधीर मोघे, द. मा. मिरासदार इ. चे साहित्य पण तज्ज्ञांखेरीज कुणाला न वाचता येणारे.

**आपले छंद :** दिनकर शिलेदार
ऐतिहासिक पुरुषांचे छंद-स.मा.गर्गे, नारायण फडके यांचे छंदानंद-*नंदा सुर्वे,* नोबेल विजेत्यांचे जग-*निरंजन घाटे,* बुलंद इच्छाशक्ती-*सुरेश गरसोळे,* क्रिकेटमधील राजकारण-*बाळ ज. पंडित,* हॉलिवूड चित्रपटांचा 'गुलजार' आस्वादक-*विनायक नातू.*

**आरती :** सी.श्री. उपाध्ये
अत्रे-फडके वाद-*पु.द. कोडोलीकर,* लेखक व वाचक यांच्यातील संज्ञापन-*उदय खानोलकर,* शब्दार्थांचे सहितत्त्व-*म.सु. पाटील.*

**आरोग्य तेथे :** दिलीप देवधर
साथीचे आजार-*दिलीप देवधर,* गुप्तरोग-*प्रवीण भारतीया,* टी.व्ही. आणि मुले-*मंजुषा खटावकर.*

**आरोग्यश्री :** सु.दि. बगाडे
आबालवृद्धांच्या आरोग्यासंबंधी तज्ज्ञांचे लेख.

**आरोग्य ज्ञानेश्वरी :** हेमंत जोशी आणि इतर
दासबोधातील आरोग्य संकल्पना-*मोहन कुलकर्णी,* झोप किती आवश्यक-*श्रीनिवास चाफळकर.*

**आशय :** नितिन वैद्य-जयंत राळेरासकर
जी.ए. कुलुप आणि किल्ली : *पंडित आवळीकर,* बखर-डांगोरा-उच्छाद एक भूमिका-*त्र्यं.वि. सरदेशमुख,* व्यंकटेश माडगूळकरांची कथा-*चंद्रकांत पाटील.* साने गुरुजी : लांबलचक पसरलेली सावली-*रवींद्र पिंगे.*

**उत्तम कथा :** वैजयंती काळे
(सौंदर्य, आरोग्य, खाद्यपदार्थ पुरवणी)
दुरावस्थेच्या भोवऱ्यात भारतीय अर्थव्यवस्था-*अनिल जोशी,* पतिपत्नी आणि पत्रिका-*विश्वास पटवर्धन.*

**उत्सव :** रजनी कानडे
नववधु प्रिया मी सजविते-*माया परांजपे.* 'कवितेची जन्मकहाणी' मध्ये आसावरी

काकडे, संगीता बर्वे, अरविंद भुजबळ, प्रकाश पाठारे, मीनल बाठे, पिंपळखरे इ. ची मनोगते. सुधीर फडक्यांच्या सहवासात-*गंगाधर महांबरे.* कलेचा सखा (कै. पानघंटी)-*अरुण खोरे.*

**ऐक्यभारती :** दुर्गा दीक्षित
बाजीराव-मस्तानी व इतर प्रसिद्ध शाही प्रेमिकांच्या कथा-अनेक रंगीत चित्रांसह.

**कथाश्री :** अशोक लेले, प्रकाश पानसे
(ज्येष्ठ नागरिक विशेषांक)
वार्धक्य - एक वेगळा दृष्टीकोन-शांता शेळके, 'खूप काही सांगायचंय' या सदरात बेडेकर पतिपत्नी, शिरवाडकर, चंद्रशेखर धर्माधिकारी, सदानंद वर्दे, वसंत बापट इ. ची मनोगते.

**कालनिर्णय :** जयराज साळगावकर
आपला माणूस (आर. के. लक्ष्मण) *कुमार केतकर,* नेते-चमचे नि मिठी-*अशोक जैन,* **मधु :** राजकारणातला माणूस-*चंपा लिमये.* माझं वाचन-*अरुण टिकेकर,* कोस्सलर आणि ऑर्वेल-*विश्वास पाटील,* 'गानगुरु' या विभागात काही गायकांचे अनुभव.

**किशोर :** कार्यकारी संपादक ज्ञानदा नाईक
व्याघ्रसंवर्धन वर्षानिमित्त जयंतराव टिळक, व्यं. माडगूळकर, मारुती चितमपल्ली इ. चे लेख. जुन्नरच्या बाजारातील रशियन प्रवासी (१५ वे शतक)- *गंगाधर महांबरे*

**किस्त्रीम :** माधुरी वैद्य-*शिवराज गोर्ले*
जगज्जेता सचिन-*नीला उपाध्ये,* जिवंत-स्वदेशी: साधक आणि बाधक-*राजीव साने.* गोपाळ गणेश आगरकर-*अंजली कीर्तने,* स्त्रियांच्या साहित्यातील पुरुष-*अश्विनी धोंगडे,* पुणे विद्यापीठ. सुवर्ण महोत्सव-*एन.सी. जोशी*

**कृषीवल :** एस.एम. देशमुख
'आघाडी सरकारला पर्याय आहे का?' या विषयावर मुझफर हुसेन, मृणाल गोरे, चंद्रशेखर धर्माधिकारी, अहिल्या रांगणेकर, प्रकाश जावडेकर यांचे लेखन.

**केसरी :** अरविंद व्यं. गोखले
नवी संस्कृती नवी स्मृती-*ज. श्री. टिळक,* हॉलंड वास्तवातलं-*अनिल अवचट,* वॉशिंग्टन ते क्लिंटन-*अनिकेत देसाई,* पं. जितेंद्र अभिषेकी-*सुधीर मोघे.*

**कोकणसत्ता :** सुदेश शेट्ये
रजिया पटेलांशी हितगूज-*प्रज्ञा घाणेकर*
स्त्री चळवळीकडे थांबून बघताना-*विद्या बाळ*

**गंधाली :** म.के. वर्तक
स्वतंत्र भारताची भाषासमस्या-*मो. दि. पराडकर*
पेशवाई उदय आणि अस्त-*उषा परांडे*
वळुनि पाहता मागे-*राजाभाऊ गवांदे.*

**गावकरी :** वंदन अ. पोतनीस
'शोध संस्कृतीचा' या विभागात मे.पुं.रेगे, विजय तेंडुलकर, चंद्रशेखर धर्माधिकारी, पांडुरंग शास्त्री आठवले यांचे लेख. 'शोध संस्कारांचा' विभागात उस्ताद अल्लारखां, सुभाष अवचट, नरेंद्र दाभोळकर, विजया लवाटे यांचे लेखन.

**गृहशोभिका :** विश्वनाथ
'परक्या व्यक्तींबरोबर शरीरसंबंध' या विषयावर काही स्त्रियांचे मतप्रदर्शन.

**ग्राहकहित :** सूर्यकांत पाठक
राजकारण, लोकप्रतिनिधी, शिक्षण, आहार, भेसळ, प्रेम, पोखरण, फसवणुका इ. विषयांवर तज्ज्ञांचे अनुभवकथन.

**चंद्रपूर शक्ती :** अशोकसिंह चंदेल
दुसऱ्या महायुद्धाचा मराठी साहित्यावरील प्रभाव-*सतीश पावडे.* श्रीबसवेश्वर-*अनिल*

